

करी मनोरंजन ज़ो मुलांचे । जडेल नाते प्रभुशी तयाचे ।।

सानेगुरुजींच्या गोड गोष्टी सानेगुरुजींच्या गोड गोष्टी सानेगुरुजींच्या गोड गोष्टी

''करी मनोरंजन जो मुलांचे।
जडेल नाते प्रभुशी तयाचे।।''

गोड गोष्टी : भाग नववा

# यती की पती

: लेखक :

सानेगुरुजी, एम्. ए.

सानेगुरुजींच्या गोड गोष्टी सानेगुरुजींच्या गोड गोष्टी सानेगुरुजींच्या गोड गोष्टी




किंमत १५ रूपंये

केशव भिकाजी ढवळे संस्था शताब्दी वर्ष गणेशचतुर्थी १९०० ते २०००

पहिली आवृत्ती १९४१,
सव्वीसावी आवृत्ती १९९१
पुनर्मुद्रणे १९९२, १९९३, १९९४
१९९६, १९९८
बत्तिसावे पुनर्मुद्रण १९९९

**टाईपसेटिंग**
अक्षय फोटो टाइपसेटर्स
१- चित्रकूट
डॉ. आंबेडकर मार्ग, ठाणे ४०० ६०१

**मुद्रक**
जस्मिन आर्टस्
सदाशिव गणेश परूळकर
वडाळा उद्योग भवन
वडाळा, मुंबई ४०० ०३१

**प्रकाशक**
ज्योती धनंजय ढवळे
केशव भिकाजी ढवळे
पहिली भटवाडी, गिरगाव,
मुंबई ४०० ००४

# मानवता आणि धर्म

"Cloister and the Hearth" या नावाची इंग्रजी भाषेत एक अत्यंत सुंदर कादंबरी आहे. मला ती गोष्ट फार आवडते. अनेक लहानमोठ्या मित्रांना ती गोष्ट तुरुंगात व तुरुंगाच्या बाहेरं मी माझ्या पद्धतीने सांगत असे. त्यांनाही ती आवडे. ती मी लिहून काढून महाराष्ट्रास देत आहे. मी जशी सांगत असे तशीच ती लिहून काढली आहे. ही गोष्ट वाचकांस आवडली तर त्याचे श्रेय मूळच्या थोर लेखकास आहे. न आवडली तर त्याचा दोष माझा आहे.

गोड गोष्टींचा हा नववा भाग वाचक गोड करून घेवोत. आता दहावा भाग देऊन ही माला पुरी करणार आहे. मग दुसरी एखादी माला जगलो, वाचलो, सर्वत्र शांती, स्वातंत्र्य व आनंद ही आली म्हणजे देईन; परंतु पुढचे सारे भारतभाग्यविधात्या प्रभूचे हाती.

**साने गुरुजी**



भाग नववा : यती कि पती

# अनुक्रमणिका



यती की पती : प्रकरण पहिले

# कलावान विजय

कनोज प्रांतात शिरसमणी नावाचा एक गाव होता. त्या गावात बलदेव म्हणून एक गृहस्थ होता. त्याच्या पत्नीचे नाव पार्वती. बलदेव एका व्यापाऱ्याकडे नोकरीस होता. बलदेवाचा प्रपंच फार मोठा होता. मुलेबाळे कोणाला नको का असतात? परंतु त्यांना पोसायचे कसे हा प्रश्न पडला म्हणजे मात्र कशाला देतो देव ही मुले असे मनात येते.

बलदेवाला पाच मुलगे होते. एक मुलगी होती. एवढ्या सर्वांना पोसणे मोठे कठीण काम होते. मुलांची नावे अशोक, आनंद, सुव्रत, विजय व सुमुख अशी होती. मुलीचे नाव मंजुळा. मंजुळा खरेच गोड बोलणारी होती. त्या घरातील ती संगीत होती. घरात भांडणे सुरू झाली की, मंजुळा ती भांडणे मिटवायची. ती आपला खाऊ देईल, ती मिळते घेईल. ज्याची बाजू पडती असेल, त्याची ती सावरून धरावयाची. मंजुळा प्रेमळ व गुणी होती; परंतु ती पांगळी होती. तिला कुबड्या घेऊन चालावे लागे. ती अशक्त होती. ती घरात एके ठिकाणी बसून प्रेमाचा प्रकाश सर्वत्र पसरवीत असे. जरूरच पडली तर कुबड्या घेऊन बाहेर पडे. एखादे वेळेस लांबसुद्धा धडपडत जाई.

अशोक, आनंद, सुव्रत हे सारे धष्टपुष्ट होते. विजय जरी फार जाडजूड नसला तरी सशक्त होता. तो उंच होता. पाहाणाऱ्याचे मन तो ओढून घेई. त्याचे नाक तरतरीत होते. डोळे काळे व पाणीदार होते. त्याचे कान जरा लांबट होते, परंतु त्याच्या चेहऱ्याला ते शोभून दिसत.

आणि सुमुख? त्याचे नाव सुमुख होते, परंतु तो सदैव दुर्मुखलेला असे. त्याचा स्वभाव दुष्ट होता. मत्सरी होता. विशेषत: विजयवर त्याचा फार राग

असे. कारण विजयची सर्वत्र [illegible]. सुमुखला ते खपत नसे. सुमुख बुटबैंगण होता; परंतु त्याच्या [illegible] होत्या. त्याचे दात फार मोठे होते. त्याच्या [illegible] तोंडाला ते [illegible] भेसूर दिसत; परंतु ते दात बळकट होते. [illegible] तो आपली नखे वाढवी. कोणी भांडायला आला तर [illegible]. त्याच्या नखांची सर्वांना भीती वाटत असे. [illegible] असे. झाडावर चढे, दोरीला धरून कडा चढे. सुमुख [illegible] व्यक्ती होती. भेसूर व दुष्ट व्यक्ती.

[illegible]; परंतु दिवसेदिवस घरात अडचण पडू लागली. [illegible] मिळवणार?

एके दिवशी एक बुद्ध भिक्षू आला होता. त्या काळी हिंदुस्थानात बुद्ध धर्माची चलती होती. कनोज, बिहार वगैरे प्रांत म्हणजे तर बुद्ध धर्माची आगरे. त्या भिक्षूचे दर्शन घेण्यासाठी बलदेव गेला होता. वंदन करून बलदेव भक्तिभावाने तेथे बसला.

'बेटा, धर्मासाठी काही करशील की नाही?' भिक्षूने विचारले.

'मी गरीब आहे महाराज. कुटुंब मोठे. पाच मुलगे. एक मुलगी. मी एकटा मिळवता. धर्मासाठी काय करू?'

'धर्मासाठी एक मुलगा दे. पैशापेक्षा धर्माला माणसांची जरूर असते. भगवान बुद्ध धर्माचा प्रसार करण्यासाठी सर्वत्र प्रचारक पाठवीत. सम्राट अशोक याने तर त्या काळी माहीत असलेल्या सर्व जगात धर्मप्रचारक पाठविले. सूर्याचे हजारो किरण सर्वत्र जातात व अंधार दूर करतात, त्याप्रमाणे धर्माचा प्रसार करणारे जगाच्या कोनाकोपऱ्यात गेले पाहिजेत. त्यांनी अधर्माचा अंधार दूर केला पाहिजे; परंतु माणसेच नाहीत. तेजस्वी, पराक्रमी, कर्ते असे नवयुवक मिळाले पाहिजेत. तुला पाच मुलगे आहेत. एक धर्माला दे. सर्व कुळाचा तो उद्धार करील. आध्यात्मिक वैभव कुळाला देईल. खरे ना?'

'होय महाराज.'

'तुमच्या शिरसमणी गावात एक मठ आहे; परंतु तेथे कोणी शिकायला जात नाही. दुःखाची गोष्ट. तुझ्या एखाद्या मुलाला पाठव. तयार होईल. धर्माची सेवा म्हणजे जगाची सेवा.'

'खरे आहे महाराज. मी एक मुलगा धर्मासाठी देईन.' भिक्षूस प्रणाम करून बलदेव घरी आला. कोणता मुलगा धर्मासाठी द्यावा याचा तो विचार करीत होता. आपला विजय सर्वांत चांगला आहे. उंच आहे. तेजस्वी आहे. दिसतोही सुंदर. जी वस्तू धर्मासाठी द्यायची ती चांगली असावी. विजयपेक्षा अधिक चांगली वस्तू माझ्याजवळ नाही. विजय धर्माला देऊन टाकावा. त्याने मनात ठरविले.

हळुहळू त्याने आपला विचार घरात प्रगट केला. गावातही तो कळला. बलदेवाचा संकल्प ऐकून सर्वांनी प्रशंसा केली; परंतु विजय काही बोलला नाही. मंजुळाही जरा खिन्न झाली.

एके दिवशी जेवताना अशोक म्हणाला, 'आई, मी आता दूर जातो. कोठे तरी उद्योगधंदा करीन. मी आता मोठा झालो. घरी अडचणच असते. मथुरेला जाईन म्हणतो.'

'जा बाळ. घरी संपत्ती असती तर सारी एकत्र राहाती; परंतु हळुहळू एकेकाला घरट्यातून बाहेर पडलेच पाहिजे.' आई म्हणाली.

अशोक निघून गेला आणि त्याच्या पुढच्या वर्षी आनंद व सुव्रत हेही गेले. घरात आता विजय, सुमुख व मंजुळा तिघेच होती.

विजय त्या मठात अभ्यासासाठी जाऊ लागला. शिकू लागला. त्याला हस्तलिखित ग्रंथांच्या प्रती करायला सांगत. विजयचे हस्ताक्षर फारच सुंदर होते. कसे झपझप व वळणदार तो लिही. भिक्षू त्याच्यावर प्रसन्न असत. गावात एक चित्रकार होता. त्याच्याकडेही विजय जायचा. विजयला चित्रकलेची देणगी होती. तो सुंदर चित्रे काढू लागला. तो सुंदर आकृती काढी, मनोहर रंग भरी. फुले, पाखरे, पशू, माणसे सर्वांची तो चित्रे काढी. कधी कधी मोठमोठे प्रसंग रंगवी.

विजय धर्मज्ञान शिकत होता. चित्रकलाही शिकत होता. त्याला चित्रकला शिकण्याची आणखी एक संधी आली. कनोजच्या राजघराण्याशी संबंध असलेली एक पोक्त पावन स्त्री शिरसमणी येथे राहायला आली. बुद्धभिक्षूंच्या मठाजवळ एका सुंदरशा पर्णकुटीत ती राहू लागली. तिला माईजी म्हणून संबोधण्यात येई. माईजी चित्रकलेत पारंगत होत्या. एकदा त्या मठात गेल्या असता विजय त्यांच्या दृष्टीस पडला. एका हस्तलिखित ग्रंथाभोवती विजय वेलबुट्टी काढीत होता.

‘तुला चित्रकलेचा नाद आहे वाटतं?’ माईजींनी विचारले.

‘होय माईजी. मला फारसे येत नसले तरी शिकावे असे वाटते.’ विजय विनयाने म्हणाला.

‘माझ्याकडे येत जा. मी धडे देईन.’ त्यांनी सांगितले.

‘आपली कृपा.’ तो कृतज्ञतेने म्हणाला.

विजय माईजींकडे जाऊ लागला. त्या त्याला रंग देत. कुंचले देत. चित्रे काढण्यासाठी विशिष्ट असे कापडी पुठ्ठे देत. त्याला चित्रकलेचे तंत्र त्या शिकवीत. चित्रकलेतील छायाप्रकाशाची महती त्याला सांगत. चित्रात चैतन्य कसे आणावे, गतिमान अशी चित्रे कशी काढावी, सारे त्या सांगत.

कनोजचा राजा कलाप्रेमी होता. त्याने आपल्या राज्यातील कलांना उत्तेजन मिळावे म्हणून एक मोठे प्रदर्शन भरविण्याचे ठरविले. राज्यात सर्वत्र दवंडी दिली गेली. शिरसमणी गावातही दवंडी झाली.

विजयच्या मनात आले की, आपणही त्या प्रदर्शनासाठी काही पाठवावे. त्याने मंजुळेजवळ ही गोष्ट काढली.

‘विजय, खरेच पाठव तू तुझे नमुने. तुला बक्षीस मिळेल. तुझी कीर्ती पसरेल. छान होईल. माझ्याजवळ थोडे पैसे आहेत. ते तू घे. रंग घे. पुठ्ठे घे. कर तयारी.’

मंजुळा विजयला नेहमीच उत्तेजन द्यायची. बहिणीने दिलेली स्फूर्ती घेऊन विजय काम करू लागला. त्याने माईजींच्या देखरेखीखाली सुंदर चित्रे तयार केली. त्याचप्रमाणे स्वत:च्या हस्ताक्षरातील एक सुंदर पोथीही वेलबुट्टी वगैरे बाजूला काढून त्याने तयार केली. त्या वस्तू तयार झाल्या. ग्रामाधिकाऱ्याकडे आपले नाव, वय, पत्ता वगैरे घालून विजयने त्या वस्तू नेऊन दिल्या.

प्रदर्शनामध्ये ज्यांच्या ज्यांच्या वस्तू ठेवण्याच्या लायक ठरतील त्यांना प्रदर्शनार्थ बोलावण्यात येणार होते. राजा त्या सर्वांचा सत्कार करणार होता. त्यांना मेजवानी व बक्षिसे देणार होता. विजय आमंत्रणाची वाट पाहात होता.

‘तुला येणारच नाही बोलावणे. तुला कुत्र्याला कोण बोलावणार? रद्दी तुझी चित्रं.’ सुमुख मत्सराने म्हणाला.

‘सुमुख, असे बोलू नये. आपल्या भावाचा असा पाणउतारा करू नये. त्याचा गौरव झाला तर तो आपला सर्वांचाच आहे.’ मंजुळा म्हणाली.

'विजयची चित्रे मी फाडून टाकणार होतो.'

'फाडली असतीस तर तुझे हे दात पाडून टाकले असते.' विजय एकदम येऊन रागाने म्हणाला.

'ये रे, ये, पाड. तुझ्या पोटातच घुसवतो माझे दात व ही नखे. तुझ्यासारखा मी उंच नसलो तरी तुला फाडून टाकीन. मी वाघ आहे, अस्वल आहे, समजलास?'

मंजुळेने त्या दोघांना दूर केले. विजय कोठे बाहेर जायला निघाला; परंतु इतक्यात ग्रामाधिकाऱ्याने लखोटा आणून दिला. विजयला आमंत्रण आले होते. राजाच्या सहीचे आमंत्रण! आईबापांस आनंद झाला. मंजुळेला आनंद झाला. विजय ती वार्ता सांगण्यासाठी माईजींकडे गेला. त्याला आज कृतार्थता वाटत होती.

※ ※ ※

यती की पती : प्रकरण दुसरे

# प्रदर्शनार्थ प्रयाण

ग्रामाधिकारीही राजधानीस जाणार होता. विजयने त्याच्याबरोबरच जावे असे आईबापांस वाटत होते; परंतु ग्रामाधिकारी आपल्या घोड्यावरून जाणार होता. विजय त्याच्याबरोबर कसा जाणार ? विजय पायी जाणार होता.

'बाबा, मी पायीच जाईन. पुरे, पट्टणे, वने, उपवने बघत जाईन. मी योग्य वेळी पोचेन. काळजी नका करू.' असे विजय म्हणाला.

माईजींनी राजघराण्यातील कोणाला तरी एक पत्र लिहून त्याच्याजवळ दिले. विजयची तयारी झाली. त्याने सुंदर पोषाख केला. आईने बरोबर लाडू वगैरे दिले. लाह्यांचे पीठ दिले. गूळ दिला, थैली तयार झाली.

'विजय, विजयी होऊन ये.' मंजुळा म्हणाली.

'ये हो बाळ.' मायबाप म्हणाले.

'सुमुख, नीट वाग घरात. ताईला व आईला त्रास नको देऊ.' विजय सुमुखला म्हणाला.

'आम्हाला समजते म्हटले. चालते व्हा. निघू दे तुमची धिंडका एकदाची.' सुमुख म्हणाला.

विजय निघाला. बाप गावाच्या सीमेपर्यंत पोचवायला गेला व माघारा आला. एकटा विजय जात होता. आशेचे तेज त्याच्या चेहऱ्यावर होते. तो आता भर तारुण्यात होता. एक प्रकारचा कोमल असा तजेला त्याच्या तोंडावर चमकत होता. गाणी गात जात होता. धर्मग्रंथांतील पाठ केलेला भाग, म्हणत जात होता.



एके दिवशी वाटेत त्याने एक दृश्य पाहिले. एक म्हातारा मनुष्य जमिनीवर पडला आहे व त्याच्याजवळ एक मुलगी बसली आहे, असे त्याने पाहिले.

'बाबा, फार का थंडी वाजते?' ती मुलगी विचारीत होती.

'जीव घुटमळत आहे, पोरी. काही तरी कडकडीत प्यायला दे. काय देशील या रानात?' तो म्हणाला. ती मुलगी दुःखी झाली होती. काय करावे ते तिला सुचत नव्हते. विजय त्यांच्याजवळ गेला.

'आज फार थंडी आहे. यांना बाधली वाटते? गारठून का गेले? थांबा हं. मी गवत आणून पेटवतो.' असे म्हणून आपली थैली तेथे ठेवून तो गवत उपटून आणण्यासाठी गेला. त्याने गवत आणले. वाळलेल्या काटक्या आणल्या. त्याने आपली चकमक झाडून ठिणगी पाडली. त्याने गवत पेटवले. काटक्या पेटवल्या. म्हातारा आनंदला. हुशार झाला.

'काही गरम पेय करता येईल का?' त्या मुलीने विचारले.

'हो.' विजय आनंदाने म्हणाला.

विजयने थैलीतील एक पातेली काढली. तो पाणी घेऊन आला. त्याने पीठ पातळसर कालवले, त्यात चवीला थोडा गूळ घातला. ती पातेली त्याने

निखाऱ्यांवर ठेवली. ते पातळ मिश्रण कढत झाले; परंतु पिणार कसे? विजयला एकदम एक युक्ती सुचली. तो पळत पळत गेला व गवताची एक लांब नळी घेऊन आला. ते एक विशिष्ट प्रकारचे गवत असते. ते पोकळ असते.

'आजोबा, ही नळी तोंडात धरा व ह्या पातेलीतून घ्या वर ओढून. तोंड भाजणार नाही; परंतु गरम गरम पिता येईल.'

म्हाताऱ्याने त्याप्रमाणे केले. त्याने ती पातळ लापशी संपविली. त्याला तरतरी आली. आतबाहेर ऊब आली.

'बाबा, आता चालवेल ना?' मुलीने विचारले.

'हो. चालवेल हो बाळ.' म्हातारा म्हणाला.

'तुम्हाला कोठे जायचे?' विजयने विचारले.

'आम्ही कनोजला प्रदर्शन पाहायला जात आहोत. बाबांना कलावस्तू पाहाण्याचा फार नाद. त्यांच्याने राहावेना; परंतु आम्ही गरीब. पायीच निघालो. कनोजला आमचा एक नातलग आहे. त्याच्या ओळखीने प्रदर्शन पाहायला मिळेल. त्याला निरोप पाठवला आहे.' मुलीने सांगितले.

'मी सुद्धा कनोजलाच जात आहे. प्रदर्शनासाठी मी चित्रकलेचे नमुने पाठविले आहेत. मला राजाचे बोलावणे आले आहे. आपण बरोबर जाऊ. मी एकटा जात होतो. तुमची संगत होईल.' विजय म्हणाला.

'देवच पावला. आम्हाला तुमचा आधार होईल. बाबा म्हातारे. मी काळजीतच होते. चला, हळुहळू जाऊ. तुमचा रुमाल बांधा.' ती मुलगी म्हणाली.

विजयने आपला रुमाल डोक्याला बांधला. तो जरा नीट आला नाही. ती मुलगी हसली.

'चांगला नाही वाटतं आला?' विजयने विचारले.

'जरा वाकडा आहे.' ती म्हणाली.

'निघताना नीट बांधला होता. मला सवय नाही.'

'मी देऊ बांधून? करा डोके पुढे.'

'तुम्हाला येतो बांधायला?'

'हो. मी घरी एखादे वेळेस बाबांचा जुना रुमाल माझ्या डोक्याला बांधीत बसते गंमत म्हणून.'

'बांधा माझ्या डोक्याला.'

त्या मुलीने विजयच्या डोक्याला रुमाल बांधला.

'आता खरेच तुम्ही छान दिसता.' म्हातारा म्हणाला.

'चला आता निघू.' मुलगी म्हणाली.

ती तिघे चालू लागली. गप्पाविनोद करीत जात होती. मधूनमधून कलेवर, धर्मावर चर्चा होत होत्या.

इतक्यात पाठीमागून घोड्याच्या टापा ऐकू आल्या. कोण येत होते घोडा उधळीत? तो शिरसमणीचा ग्रामाधिकारी होता. त्याने त्या तिघांकडे पाहिले. तो म्हातारा व ती मुलगी यांना तो ओळखीत असावा. त्याने कपाळाला आठ्या घालून त्यांच्याकडे पाहिले. तो तिरस्काराने भेसूर हसला.

'काय विजय, यांची कोठे ओळख झाली? अशी ओळख बरी नाही. तुझ्या बापाला कळले तर तो रागावेल हो. बाकी तुम्ही तरुण मुले. हाः हाः हाः!'

असे म्हणून त्याने घोड्याला टाच मारली.

'असे काय तो म्हणत होता?' त्या मुलीने विचारले.

'तो फार दुष्ट आहे.' विजय म्हणाला.

'तुम्ही आमच्याबरोबर नका येऊ. तो तुम्हाला त्रास देईल.'

'मला कोणाची भीती नाही.'

प्रवास चालला होता. वाटेत एके दिवशी म्हातारा फारच दमला. विजयने त्याला पाठुंगळीस घेतले. त्याची थैली त्या मुलीने घेतली. एकदा त्या मुलीच्या पायात एका नदीतून जाताना काटा मोडला; परंतु विजयने तो काटा काढला व त्याने वर भिलावा लावला.

राजधानी आता जवळ येत होती.

'तुम्ही कोठे जाणार उतरायला?' विजयने विचारले.

'आम्ही त्या आमच्या नातलगाकडे जाऊ. तुम्हाला प्रदर्शनगृहात येऊन भेटू. तेथे तुम्ही असा हां. आम्हाला विसरू नका.' ती मुलगी म्हणाली.

'आपण बरोबरच परत फिरू.' विजय म्हणाला.

'परंतु राजधानीत चुकामूक नाही होता कामा.' ती म्हणाली.

'आपली चुकामूक आता कधीही होणार नाही.' तो म्हणाला.

※ ※ ※

यती की पती : प्रकरण तिसरे

# राजधानीत

राजवाड्याच्या भव्य पटांगणात प्रदर्शन भरले होते. सर्व राज्यांतून नानाविध कलांचे नमुने आले होते. तलम तलम वस्त्रे, नाना रंगांची व प्रकारांची तेथे होती. जरीचे प्रकार होते. रेशमी वस्त्रे होती. लोकरीच्या सुंदर शाली होत्या. गालिचे होते. जणू खरोखरची फुलेच आहेत असे वाटे. तेथे धातूंचे प्रकार होते. सोन्याचांदीचे शेकडो कलात्मक प्रकार. हस्तिदंताच्या वस्तू, शिंगांच्या वस्तू, चंदनी मूर्ती, पाषाणांच्या नाना वस्तू, सारे तेथे होते. चित्रकलेचा भागही गजबजलेला होता. हस्तलिखिते एका विभागात हारीने मांडून ठेवलेली होती.

प्रदर्शनमंडप भव्य होता. त्याला सोनेरी झालरी सोडल्या होत्या. मंडपावर उंच ध्वज फडकत होता. राजवाड्याच्या प्रवेशद्वाराशी तुफान गर्दी होती. द्वाररक्षक फक्त प्रवेशपत्रिका ज्यांच्याजवळ असत त्यांनाच आत सोडीत होते. त्या गर्दीत तो पाहा एक म्हातारा व एक मुलगी धडपडत आहेत. लोकांच्या लाटा उसळत आहेत. बापाचा हात धरून ती मुलगी दरवाजाशी जाऊ पाहात आहे.

'अहो, आमचा एक नातलग आत आहे. आम्हाला जाऊ द्या आत. सोडा आम्हाला आत.' ती मुलगी विनवीत होती.

'दरवाजा आता बंद. कोणासही आता आत घेतले जाणार नाही. गर्दी मोडा. हटा.' ते शिपाई ओरडत होते. इतक्यात विजय तेथे आला. तो गर्दीतून घुसून रस्ता काढीत त्या मुलीजवळ आला.

'अहो, आम्हाला आत सोडा. ही दोघे माझ्याबरोबर आलेली आहेत. मला परवाना आहे. माझी चित्रे प्रदर्शनात आहेत. सोडा.'

'चल, चावट कोठला. त्या मुलीबरोबर आत घुसू पाहातोस वाटते? म्हणे चित्रे आहेत माझी. हो चालता.' द्वाररक्षक म्हणाला.

'अहो, माझ्या खिशात खरोखरच आमंत्रण-पत्र आहे.'

इतक्यात राजाची स्वारी प्रदर्शनमंडपातून बाहेर पडली. शिपाई सर्वांना, 'शांत राहा, शांत राहा' म्हणू लागले; परंतु विजय का गप्प बसणारा होता? तेजस्वी तडफदार तरुण तो! तो ओरडू लागला, 'हे राजा, हे तुझे जुलमी शिपाई आम्हाला आत सोडीत नाहीत. माझ्याजवळ परवाना आहे, राजा.'

'अरे ए. थोबाड फोडायला हवे वाटते?' असे शिपाई म्हणू लागले; परंतु इतक्यात राजाजवळचा एक मोठा अधिकारी दौडत आला व काय आहे म्हणून चौकशी करू लागला. विजयने हकीगत सांगितली.

'घ्या त्याला व त्याच्या बरोबरच्यांना आत. प्रवेशपत्र असूनही तुम्ही लोकांना आत सोडीत नाही हे काय?' असे दरडावून तो अधिकारी गेला.

ती तिघे आत गेली. जमलेल्या हजारो लोकांना आश्चर्य वाटले.

'विजय, तू होतास म्हणून प्रवेश मिळाला.' ती मुलगी म्हणाली.

'चला, आपण प्रदर्शन पाहू.' तो प्रेमाने म्हणाला.

त्या तिघांनी प्रदर्शन पाहिले. म्हातारा न्याहाळून न्याहाळून पाहात होता. विजयचे नमुनेही त्यांनी पाहिले. म्हाताऱ्याने विजयच्या चित्रांची प्रशंसा केली.

'हा आकाशाचा रंग तुम्हाला किती छान साधला आहे!' तो म्हणाला.

'आणि ही फुलेसुद्धा किती सुंदर!' ती मुलगी म्हणाली.

'मला आता भूक लागली आहे. उपाहारगृहात जाऊ या.' विजयने सुचविले.

ती तिघे उपाहारगृहात गेली. तेथे शेकडो प्रकारची फळे होती. शेकडो खाद्यपदार्थ होते. मेवामिठाई होती. पेये होती.

'ही द्राक्षे घ्या. कशी रसाळ आहेत.' ती म्हणाली.

'मी तर खातोच आहे, तुम्ही मात्र फक्त माझ्याकडे पाहात आहात. मला पाहून का भूक शांत होईल?' विजय म्हणाला.

'बाबा, तुम्ही ही मिठाई घ्या.' ती म्हणाली.

इतक्यात विजयला माईजींनी दिलेल्या त्या चिठ्ठीची आठवण झाली. त्याने एका सेवकाबरोबर ती चिठ्ठी पाठविली. तो काय आश्चर्य? राजाने त्याला भेटीला बोलावले.

'मी येईपर्यंत तुम्ही येथे थांबा हां, जाऊ नका.' असे सांगून विजय गेला. एक नोकर हा सारा प्रकार पाहात होता. त्या मुलाचा राजाजवळ वशिला आहे हे पाहून त्याला आश्चर्य वाटले. हा नोकर म्हणजेच त्या म्हाताऱ्याचा नातलग. म्हाताऱ्याची व आपली गाठ पडू नये म्हणून तो आधीच प्रदर्शनमंडपात निघून आला होता; परंतु म्हातारा व त्याची मुलगी यांची राजाजवळ ज्याचा वशिला आहे अशाशी दोस्ती पाहून तो नातलग म्हाताऱ्याजवळ आला.

'नमस्कार. मी तुमची किती वाट पाहिली घरी.'

'परंतु घरी चिठ्ठी तरी तुम्ही ठेवायची. ती तेथे दरवाजात दाखवता आली असती. तो मुलगा भेटला म्हणून बरे. नाही तर आज फजिती होती.' म्हातारा म्हणाला.

'आता तिघे माझ्याकडे चला. सारी व्यवस्था आहे. अंथरूण पांघरूण सर्व काही आहे.' तो म्हणाला.

विजय केव्हा येतो याची ती मुलगी व म्हातारा वाट पाहात होती. म्हातारा दमून गेला होता. ती गडबड, तो आरडाओरडा, ती धक्काबुक्की यांनी तो थकून गेला होता. केव्हा येणार विजय? का तो विसरला या दोघांना?

'बाबा, फार का गळल्यासारखे वाटते?'

'होय बेटा. आता घरी जाऊ. त्या मुलासाठी येथे पत्ता देऊन ठेवू.'

तेथे असलेल्या दुसऱ्या एका नोकराजवळ 'त्या मुलासाठी हा पत्ता' असे सांगून त्या नातलगाबरोबर म्हातारा व ती मुलगी घरी निघून गेली. पुनः पुन्हा ती मुलगी मागे वळून पाहात होती; परंतु तो तरुण तिला दिसला नाही.

विजय राजाकडे गेला. विनयाने खाली मान घालून तो उभा राहिला.

'माईजींजवळ तू शिकतोस वाटते?' राणीने विचारले.

'होय सरकार.'

'चांगला शीक. मोठा कलावान हो. हे घे तुला सुवर्णपदक आणि हे शंभर रुपये.' राजा म्हणाला.

'हे आणखी एक पदक घे.' राजकन्या म्हणाली.

'मुला, कधी आयुष्यात अडचण आली तर अर्ज कर. समजलास ना? कर्तबगार तरुण हो.' राजा म्हणाला.

विजय त्या सन्मानाने लाजला. तेथे गायन चालले होते. राजकन्येने त्याला बसायला सांगितले.

'हे गाणे तुमच्या ओळखीचे आहे?' तिने विचारले.

'होय. माईजी हे गाणे म्हणतात.' तो म्हणाला.

'बरोबर.' ती म्हणाली.

विजयचे लक्ष तेथल्या गाण्यात नव्हते. त्याचे लक्ष दुसरीकडे होते. ते वृद्ध व त्यांची मुलगी आपली वाट पाहात असतील असे सारखे त्यास वाटत होते. शेवटी एकदाची त्याची तेथून सुटका झाली. तो आनंदाने व उत्सुकतेने पूर्वीच्या जागी आला; परंतु तेथे कोणी नव्हते. कोठे गेली ती मुलगी? कोठे गेला तो वृद्ध? अशी कशी गेली? त्यांना का माझा मत्सर वाटला? का ती कंटाळली? परंतु त्यांनी निरोपही ठेवला नाही. कोठे शोधू त्यांना? ज्या नोकराजवळ त्या वृद्धाने व त्याच्या मुलीने निरोप व पत्ता देऊन ठेवला होता तो नोकर तेथे दारू पिऊन पडला होता. त्याला शुद्ध राहिली नव्हती. विजयने इकडे तिकडे पाहिले. शेवटी तो दरवाजातून बाहेर पडला. राजधानीत त्याने त्या दोघांना खूप शोधले, परंतु पत्ता लागेना. त्याला वाईट वाटले. ती पदके भिरकावून द्यावी असे त्याला वाटले. त्याला त्या मुलीचा राग आला. हसे तर गोड, परंतु अशी कशी फसवी? असे तो मनात म्हणाला. अशी सुंदर माणसे का मत्सरी असतील? शेवटी पत्ता लागत नाही असे पाहून तो राजधानी सोडून परत निघाला.

रस्त्याने हजारो लोक जवळपासचे जात होते; परंतु त्या गर्दीत ती मुलगी दिसत नव्हती, तो म्हातारा दिसत नव्हता. विजयला चुटपुट लागली. कशाला आपण राजाला चिठ्ठी पाठवली असे त्याला झाले. सोन्याचे पदक मिळविले, परंतु प्रेमाचे पदक गमावले असे त्याला वाटले.

※ ※ ※

यती की पती : प्रकरण चौथे

## घरी परत

तो असा विषण्ण व उदासीन होऊन जात होता, तो एकदम त्याला दूर ती मुलगी दिसली. ढगाआड असलेला चंद्र दिसावा तसे त्याला वाटले. तो धावत आला. त्यांच्याजवळ येऊन उभा राहिला.

'तुमची किती वाट पाहायची? शेवटी आम्ही निघालो. म्हटले, राजाने ज्यांचा सन्मान केला ते आमच्याबरोबर कशाला येतील? आम्ही गरीब. सामान्य माणसे.' ती मुलगी म्हणाली.

'परंतु मी तुम्हाला राजाकडून मी येईपर्यंत थांबा असे नव्हते का सांगितले? मी तेथे आलो तो कोणी नाही.'

'परंतु एकाजवळ तुमच्यासाठी तेथे पत्ता देऊन ठेवला होता. तुम्ही याल म्हणून घरी रसोई करून ठेवली होती; परंतु तुमचा पत्ता नाही. दोन दिवस वाट पाहून शेवटी आम्ही निघालो.' ती म्हणाली.

'परंतु तेथे कोणीही मला पत्ता दिला नाही. तेथे कोणी नव्हते. एक मनुष्य मात्र दारू पिऊन तर्र होऊन पडला होता. मी शहरात सर्वत्र तुम्हाला पाहात होतो. शेवटी निराश होऊन मी निघालो. राजाने माझी लौकर सुटका करावी म्हणून मी तडफडत होतो. त्याच्या मुलीने गाणे ऐकायला बसवले. माझे सारे लक्ष तुमच्याकडे होते. तुम्हाला कसे पटवू? तुम्ही गरीब, तसा मीही गरीबच आहे.

'तुम्हाला वाईट वाटले वाटते?' तिने हळुवारपणे विचारले.

'परंतु आता सारी भेटलो. छान. गैरसमज गेले. आपण आता हसत खेळत जाऊ. चर्चा करीत जाऊ. धरा माझा हात.' म्हातारा म्हणाला.

ती तिघे आनंदाने जात होती. पुन्हा एके दिवशी टापटाप घोड्यांचा आवाज आला. कोण येत होते? तो ग्रामाधिकारी. त्या ग्रामाधिकाऱ्याने या तिघांना पुन्हा आज एकत्र जाताना पाहिले. त्याच्या कपाळाला आठ्या पडल्या.

'पुन्हा तिच्याबरोबर! विजय, हे बरे नाही. सोड हे छंद. तुझ्या पित्याचा संकल्प ध्यानात ठेव. तुला यती व्हायचे आहे, पती नाही.' असे म्हणत तो दौडत गेला.

'काय बडबडला तो?'

'त्याला काहीतरी बडबडायची सवयच आहे.' विजयने सांगितले.

एके ठिकाणी तिघांनी वाटेत स्वयंपाक केला. विजयने पाने आणून पत्रावळी लावल्या. त्या मुलीने भाकऱ्या भाजल्या. पिठले केले. आनंद! वनात असे झऱ्याकाठी खाण्यात किती मजा वाटते!

आता त्यांचे रस्ते अलग फुटणार होते. त्या तिघांची ताटातूट होणार होती.

'तुमचे नाव काय?' तिने विचारले.

'विजय.' तो म्हणाला.

'खरेच तुम्ही विजयी व्हाल. जीवनात सर्वत्र विजयी व्हाल.' ती म्हणाली.

'आणि तुमचे नाव काय?' त्याने विचारले.

'माझे नाव मुक्ता.' ती म्हणाली.

'किती सुंदर नाव!' तो म्हणाला.

'तुमचे काय वाईट आहे?' तिने हसून विचारले.

'दोघांची छान आहेत.' तो वृद्ध म्हणाला.

तिघे आता मुकाट्याने जात होती आणि तो निराळा रस्ता आला. तो वृद्ध व त्याची ती मुलगी वळली. विजय तेथेच उभा होता.

'प्रणाम, विजय,' मुक्ता म्हणाली.

'प्रणाम.' विजय म्हणाला.

कितीदा तरी मुक्ताने मागे वळून पाहिले. विजय तेथेच उभा होता. ती दिसेनाशी झाल्यावर विजय निघाला. घरी आई वाट पाहात असेल, मंजुळाताई वाट बघत असेल, असे आता त्याच्या मनात आले. तो झपझप चालू लागला. त्याच्या डोक्यात विचारांचे वारे जोराने वाहात होते. त्याच्या हृदयात भावनांचा प्रवाह घो घो करून वाहात होता आणि त्याचे पायही वायुवेगाने चालत होते.

आता सायंकाळ झाली होती. गावात दिवे लागले होते. गाईगुरे घरी परत येत होती आणि अशा वेळेस दमलेला विजय घरी आला. मंजुळाताई वाटच पाहात होती.

'आई, आला ग, विजय आला.' मंजुळा म्हणाली.

आई बाहेर आली. इतक्यात बलदेवही बाहेरून आले. सुमुखही आला. विजयने सर्व हकीगत सांगितली.

'राजा बोलला तुझ्याजवळ?' आईने आश्चर्याने विचारले.

'होय. त्याच्या मुलीने गाणे ऐकायला बसविले. ही पाहा मला मिळालेली पदके. हे शंभर रुपये. सुमुख, हे एक पदक तुला घे.' विजय म्हणाला.

'चुलीत घाल ते.' सुमुख म्हणाला.

'सुमुख, असे रे काय बोलतोस?' मंजुळा म्हणाली.

'ताई, हे घे तुला २५ रुपये. हे २५ आईला. २५ बाबांना. हे २५ सुमुखला.' विजय वाटणी करीत म्हणाला.

'विजय, तुला नकोत का? रंग, कुंचले, पुठ्ठे यांसाठी नकोत का? ठेव, तुझ्यासाठी ठेव. विजय, तू मोठा होशील.' मंजुळा म्हणाली.

'आई, मी माईजींकडे जाऊन येतो.'

असे म्हणून विजय माईजींकडे गेला. त्यांच्या पाया पडला. त्यांनी आशीर्वाद दिला. विजयचे यश ऐकून त्यांना आनंद झाला.

'आणि माईजी, तुमचे आवडते गाणे राजकन्येने म्हटले.'

'खरे की काय? मला तिचा लळा होता.'

'जातो मी.'

'जा. विश्रांती घे.'

विजयला मुक्ताची आठवण येई. तिच्याकडे जावे असे त्याला वाटे; परंतु तिच्या गावाचे नाव काय? खरेच. तिच्या गावाचे नाव विचारायला आपण कसे विसरलो? वेडेच. तिचे नाव विचारले, परंतु तिच्या गावाचे नाव विचारले नाही. कोणते असेल बरे तिचे गाव?

विजय एक सुंदर चित्र तयार करीत होता. तो माईजींकडे जाई व ते चित्र रंगवीत बसे. अप्रतिम चित्र. कोणाचे होते चित्र? काय होते त्या चित्रात?

एके दिवशी ते चित्र पुरे करून विजयने आपल्या खोलीत लपवून ठेवले; परंतु मंजुळाताईने ते पाहिले.

एके दिवशी ते चित्र मंजुळा आईला दाखवीत होती.

'किती सुंदर चित्र!' आई म्हणाली.

'भगवान बुद्धांची ही यशोधरा असेल.' मंजुळा म्हणाली.

'होय. तिचेच असेल हे चित्र!' माता म्हणाली.

इतक्यात ग्रामाधिकारी तेथे आला.

'बलदेव, अहो बलदेव.' त्याने हाका मारल्या.

'बाबा घरी नाहीत. काय आहे काम?' मंजुळाने विचारले.

'तुमच्या विजयविषयी सांगायला आलो होतो. विजयला भिक्षू ना करायचे आहे? यतिधर्म ना तो घेणार आहे? धर्मासाठी त्याला अर्पण करावयाचे असा ना बलदेवांचा संकल्प आहे?' त्याने विचारले.

'हो. धर्मासाठी त्याला देऊ. सर्वांचा मग तो उद्धार करील.' माता म्हणाली.

'कसला उद्धार! तुम्हाला तो नरकात घालील. अहो, राजधानीत जाताना व येताना एका मुलीबरोबर तो होता. हसत काय, खेळत काय! लक्षणे बरी नव्हेत. जपा. तुमच्या तोंडाला तो काळिमा फाशील. तो तरुण आहे. ताबडतोब त्याला दीक्षा द्या. यती तरी करा नाही तर लग्न लावून पती करा; परंतु हे चाळे नकोत.'

'हे तुम्ही काय बोलता?' मंजुळा म्हणाली.

'जे डोळ्यांनी पाहिले ते.' तो म्हणाला.

'विजय असा नाही. हे पाहा भगवान बुद्धांच्या चरित्रातील चित्र. यशोधरेचे हे चित्र असावे. पाहा कसे सुंदर आहे. जणू देवता.' मंजुळा म्हणाली.

'अहो, हे चित्र यशोधरेचे नाही. हे त्या मुलीचे चित्र! अशीच ती आहे. विजय तुम्हाला फसवीत आहे. ही विजयची देवता आहे, प्रेमदेवता!' तो उपहासाने हसत म्हणाला. इतक्यात बलदेव आले.

'काय ग्रामपती?'

'बलदेव, विजयला जरा आवरा. त्याचे कान उपटा. आधीच लांब आहेत ते आणखी लांब व्हायला लागले. गद्धेपंचविशी जवळ येत आहे. तुम्ही विजयला धर्माच्या कामासाठी देणार ना? त्याला यती करणार ना?'

'हो. माझा तो संकल्प जगजाहीर आहे.'

'परंतु विजय तर ही असली चित्रे काढीत आहे.'

'कोणाचे हे चित्र?'

'बाबा, हे भगवान बुद्धांच्या यशोधरेचे चित्र आहे. तुम्हाला नाही वाटत?' मंजुळा म्हणाली.

'अहो, हे एका मुलीचे चित्र आहे, जिच्याबरोबर थट्टामस्करी करीत विजय राजधानीस जात होता व परत येत होता.' ग्रामपती म्हणाला.

इतक्यात विजयही तेथे आला.

'हा पाहा विजयच आला. विजय खरं सांग, हे चित्र कोणाचे? ही यशोधरा ना?' बापाने विचारले.

'नाही बाबा. हे चित्र मुक्ताचे आहे.' तो म्हणाला.

'मी सांगितले नाही? त्या बुधगावच्या म्हाताऱ्याची मुलगी. विजय, मी सांगत नव्हतो की, हे बरे नाही म्हणून?' ग्रामाधिकारी उपहासाने म्हणाला.

'विजय, तुला मी धर्माला वाहिले आहे. तू का असल्या फंदात पडलास? खबरदार! थांब, या चित्राच्या चिंधड्याच करून जाळून टाकतो. तुला भिक्षू व्हायचे आहे. यतिधर्माची दीक्षा घ्यायची आहे.' पिता गरजला.

'अशक्य, अशक्य! द्या माझे ते चित्र.' विजय म्हणाला.

पित्याने ते टरकावले. तुकडे केले. विजय वाघासारखा पित्याच्या अंगावर धावला. मंजुळेने त्याला आवरले.

'विजय, हे काय? शांत हो.' ती म्हणाली.

विजय थरथरत होता. ग्रामाधिकारी निघून गेला. बलदेव संतापाने लाल झाले होते. विजयने ते तुकडे गोळा केले. तो आपल्या खोलीत गेला. पाकळ्या जोडून पुन्हा फूल करून पाहावे त्याप्रमाणे तो ते तुकडे एकत्र करून ते चित्र जोडीत होता. ते कसे जमणार?

'दुष्ट आहेत बाबा.' तो म्हणाला.

'विजय, छान होते चित्र. ती मुक्ता का इतकी सुंदर आहे?' तिने विचारले.

'सुंदर आहे व सुस्वभावी आहे. मी यती होऊ शकणार नाही. संन्यास माझ्यासाठी नाही. मला सुखाचा संसार करू दे. ताई, बाबांचा हा काय



आततायीपणा ! मला त्यांनी कधी विचारलेही नाही. संन्यास का असा लादता येतो ?'

'बरे हो. तुझे म्हणणे खरे आहे; परंतु एकदम संतापू नको. जरा जमवून घेतले पाहिजे. बाबांचे मन आपण हळुहळू वळवू. माईजी वळवतील. राजाकडूनसुद्धा बाबांना त्या पत्र आणवतील; परंतु जरा धीराने घे. निराश नको होऊ हो विजय.' असे म्हणून मंजुळा हळुहळू निघून गेली.

विजय त्या तुकड्यांवर अश्रु- सिंचन करीत होता. ते चित्र जणू सजीव करू पाहात होता, अश्रूंनी सांधवू पाहात होता. अश्रूंच्या फुलांनी त्याची तो पूजा करीत होता.

※ ※ ※



यती की पती : प्रकरण पाचवे

# तुरुंगात



विजयला मुक्ताच्या गावाचे नाव माहीत नव्हते, परंतु ग्रामपतीने त्या गावाच्या नावाचा उल्लेख केला. बुधगाव त्या गावाचे नाव. विजय बुधगावला जायला निघाला. तिसरा प्रहर होता. तो आनंदात होता. मुक्ता चकित होईल. आपण तेथे बसू, बोलू असे मनात योजीत तो जात होता.

मुक्ताचे वडील खाटेवर पडून होते. ती तांदूळ निवडीत होती. तो दारात विजय येऊन उभा राहिला. ती एकदम उठली.

'बाबा, हे पाहा कोण आले आहे!'

'कोण?'

'मी विजय. नमस्ते.'

'बसा. तुम्ही केव्हा तरी याल असे वाटतच होते. मुक्तासुद्धा म्हणे की, तुम्ही याल.'

'परंतु तुमच्या गावाचे नाव मला माहीत नव्हते. ते कळले तेव्हा आलो. तुम्हाला मी विसरलो नव्हतो. तुमची रोज आठवण येते.'

'आम्हालाही तुमची येते. आता जेवायला राहाल ना? राहाच.' मुक्ता म्हणाली.

'परंतु घरी जायला मला उशीर होईल.'

'तुम्ही काही भित्रे नाही आणि आज चांदणेही आहे. मी तुम्हाला थोड्या अंतरापर्यंत पोचवायला येईन. राहा हं जेवायला. मी छानशी भाजी करते. वाटेत पिठले केले होते, ते आठवते का?' तिने विचारले.

'हो. ते रानातले जेवण मी कधी विसरणार नाही.'

'तुमची गोड लापशीही आम्ही कधी विसरणार नाही.'

मुक्ता स्वयंपाकाकडे वळली. विजय व मुक्ताचे वडील बोलत होते. मधूनमधून विजयही स्वयंपाकघरात डोकावत होता.

'तुम्ही बाहेरच बसा.'

'का बरे?'

'काय काय करणार आहे ते तुम्हाला आधी कळू नये म्हणून. आधी कळले, म्हणजे सारी मजा जाते. जा बाहेर.'

मुक्ताचा स्वयंपाक झाला. ती विजयला मनापासून वाढीत होती. त्यालाही भूक लागली होती.

'विजय पोटभर जेवा.' मुक्ता म्हणाली.

'पोट भरणारच नाही कधी.' तो म्हणाला.

'तुम्ही का राक्षस आहात?' तिने हसून विचारले.

'तुम्हाला वाटते का तसे?' त्याने प्रश्न केला.

'विजय, तुम्ही देवमाणूस आहात –' ती म्हणाली.

'मी साधा माणूस आहे. साधा माणूस म्हणूनच मला जगू दे. बाबा मला देव करू पाहात आहेत.' तो म्हणाला.

'म्हणजे काय?' पित्याने विचारले.

'मला म्हणतात, तू यती हो. भिक्षू हो. धर्माला वाहून घे.' विजयने उत्तर दिले.

'तुम्हाला नाही का ते पसंत?' पित्याने विचारले.

'नाही. माझी ती वृत्ती नाही. संसारातच धर्म आणावा असे मला वाटते. विरक्तीची वृत्ती ओढूनताणून थोडीच आणता येते?' विजय म्हणाला.

'तुम्हा लग्न करणार वाटते?' वृद्ध म्हणाला.

'हो.' विजयने उत्तर दिले.

'चांगले आहे, मुक्तालासुद्धा मी सांगतो; परंतु ती ऐकत नाही. का ग मुक्ता, खरे ना?' पिता म्हणाला.

'विजय, भात वाढू का थोडा?' लक्ष न देता मुक्ताने विचारले.

'नको. पोट भरले. आता उठतो.' हसून विजयने उत्तर दिले. विजय उठला. मुक्ताने त्याला विडा दिला.

'मी खात नाही.' तो म्हणाला.

'मी मुद्दाम करून ठेवला होता. तुम्हाला संन्यासी नाही ना व्हायचे ? संसार ना करायचा आहे ? लग्न ना करायचे आहे ? मग खायला काय हरकत ? घ्या.' ती म्हणाली.

'कोठून ग आणलास ?' पित्याने विचारले.

'रुक्माकाकांकडून.' ती म्हणाली.

'हा कोण रुक्माकाका ?' विजयने विचारले.

'तो एक जुना शिपाई आहे. पूर्वी राजाच्या सैन्यात होता. आता घरी असतो. फार विनोदी. त्याला पान खाण्याची फार सवय. आम्हाला त्याचा मोठा आधार आहे.' मुक्ताच्या पित्याने सांगितले.

'तुम्ही जेवा. मला पोचवायला येणार आहात ना ?' विजयने विचारले.

'हो.' ती आनंदाने म्हणाली.

मुक्ताने पटापट चार घास खाल्ले. ती तयार झाली. इतक्यात रुक्माकाकाही आले.

'यांचे नाव हो विजय.' मुक्ताने सांगितले.

'मी अंदाजाने ओळखलेच होते.' रुक्माकाका म्हणाला.

'रुक्माकाका, तुम्ही येता आमच्याबरोबर ?' तिने विचारले.

'नको. तरुणांबरोबर म्हातारी कशाला ?' तो हसून म्हणाला.

'तरुणांनी पडू नये म्हणून. त्यांना आधार म्हणून.' मुक्ता म्हणाली.

विजय, मुक्ता व रुक्माकाका निघाली. वाटेत गप्पाविनोद चालला होता.

'विजय, आता परत कधी येणार ?' रुक्माने विचारले.

'आता मी येणारच नाही.' तो म्हणाला.

'जो एकदा आला, तो दुसऱ्यांदा येणारच.' रुक्मा हसून म्हणाला.

'विजय, आता येशील तो उजाडत ये. दिवसभर राहा. बाबांजवळ बुद्धिबळे खेळ. रुक्माकाका व बाबा नेहमी खेळतात.' मुक्ता म्हणाली.

'मला बुद्धिबळे येत नाहीत.' तो म्हणाला.

'तर मग एखादे सुंदर चित्र काढून मला दे.' ती म्हणाली.

त्या फाडलेल्या चित्राचे विजयला स्मरण झाले; परंतु त्याने ती हकीगत सांगितली नाही.

'मुक्ता, तुम्ही आता परत जा. मी आता जाईन. घरी तुझे बाबा एकटे आहेत.' विजय म्हणाला.

'उद्या लग्न होऊन नवऱ्याबरोबर गेली म्हणजे त्यांना एकटेच राहावे लागणार आहे. होऊ दे थोडी एकटे राहाण्याची सवय.' रुक्मा हसून म्हणाला.

'परंतु मला मुळी लग्न करायचेच नाही.' मुक्ता म्हणाली.

'खरेच. त्याची मला आठवणच राहात नाही.' तो म्हणाला.

ती थांबली. विजय एकटाच निघाला. रुक्मा व मुक्ता उभी होती. तीही माघारी वळली. दूर कोल्हे हुकी हुकी करीत होते.

'मुक्ता, तू का खरेच लग्न करणार नाहीस?'

'रुक्माकाका, का विचारता खोदखोदून?'

'त्याचे तुझ्यावर प्रेम आहे आणि तुझेही त्याच्यावर आहे. लपवू नकोस.'

'परंतु त्याच्या पित्याची इच्छा निराळी आहे. पित्याची इच्छा तो कशी मोडील? पित्याची इच्छा मोडणे गुन्हा आहे ना?'

'पाहू काय काय होते ते.' रुक्मा म्हणाला.

पुन्हा एकदा संधी साधून विजय असाच आला. फाटक्या चित्राचे ते तुकडे घेऊन तो आला होता. आज उजाडत आला होता. येता येता वाटेतील रानफुलांचा एक सुंदर गुच्छ त्याने केला होता.

'मुक्ता, ही घे फुले. रानफुले.' तो म्हणाला.

'गोकुळातील कृष्णाला रानफुलेच आवडत असत.'

'भगवान बुद्धांनाही फुले फार आवडायची.'

'विजय, फुले म्हणजे प्रेमाची, माधुर्याची व पावित्र्याची सुगंधी सृष्टी. फूल म्हणजे ईश्वराचे स्वरूप, असे तुला नाही वाटत?'

'खरे आहे हो.'

'माझ्या बाबांना वृक्षवनस्पतींचा फार नाद होता. त्यांना औषधांची किती माहिती! किती पाले, मुळे त्यांना माहीत. आमची मोठी शेतीवाडी होती. तेथे बाबांनी खूप तऱ्हेतऱ्हेच्या वृक्षवनस्पती लावल्या होत्या; परंतु ती सारी शेतीवाडी गेली. तुमच्या गावाचा ग्रामपती आहे ना, त्याने बळकावली. बाबा

त्या बाबतीत काही बोलत नाहीत व मलाही बोलू देत नाहीत. जाऊ दे, तुला कशाला ऐकवू या कटकटी ?'

'मुक्ता, मला आता तू, 'तू' म्हटलेस.'

'आणि तूही मला आता 'तू' म्हटलेस.'

'खरेच की !'

'आज विजय, जेवायला काय करू? तुला काय आवडते ?'

'काहीही कर. तुझ्या हातचे सारे गोड. मुक्ता, तुझे माझ्यावर प्रेम आहे की नाही ?'

'मला नाही माहीत.'

'तू माझी नाही होणार ?'

'नाही.'

'खरेच का तू माझी नाही होणार ? मी आशेने होतो. रात्रंदिवस मी तुझा विचार करतो. हृदयात तुझी चित्रे रंगवतो. कागदावर काढतो. हे बघ तुझ्या चित्राचे तुकडे. मी तुझे एक सुंदर चित्र काढले होते. बाबांनी ते टरकावले. जणू माझ्या हृदयाचेच त्यांनी तुकडे केले. मुक्ता, ह्या तुकड्यांवर मी अश्रूंचा अभिषेक केला. हे बघ.'

ते तुकडे त्याने तेथे ठेवले. मुक्ता ते तुकडे जुळवीत होती. ती काही तरी विचार करीत होती.

'विजय, तुझ्या वडिलांनी हे फाडले ? आणखी काय म्हणाले ?'

'म्हणाले, खबरदार या मुलीकडे जाशील तर !'

'विजय, माझ्यासाठी जर ते तुला छळत असतील तर मी तुझीच होईन. माझे चित्र त्यांनी फाडले का ? फाडू देत. ही जिवंत मुक्ता तुझी होईल.'

'खरेच का मुक्ता ?'

'होय, खरेच.'

मुक्ता एकदम उठून गेली. तिने सुरेख स्वयंपाक केला. रुक्माकाकाने दूध व केळी आणली. केळ्यांची शिकरण. रुक्माकाकाही जेवायला राहिले.

जेवण झाल्यावर मुक्ताचे वडील व रुक्मा बुद्धिबळे खेळत बसले. मुक्ता व विजय बोलत होती. पुढचे बेत ठरवीत होती. तिसरे प्रहरी रुक्माकाका, मुक्ता व विजय तिघे फिरायला गेली. एका आंबराईत बसली.

'रुक्माकाका, तुम्ही आमचे हात एकमेकांच्या हातात द्या. योजना ठरवा.' मुक्ता म्हणाली.

'येथून थोड्या अंतरावर अंबाबाईचे एक मंदिर आहे. तेथे तुमचे दोघांचे लग्न लावू. चार प्रतिष्ठित लोक बोलावू. उपाध्याय बोलावू.' रुक्मा म्हणाला.

'परंतु विजयच्या गावच्या ग्रामणीला आणि त्याच्या वडिलांना आधी कळता कामा नये.' मुक्ता म्हणाली.

'नाही कळणार.'

ती फिरत फिरत शेवटी घरी आली. थोड्या वेळाने विजय आपल्या गावाला निघून गेला.

विजयचे वडील बलदेव परगावी गेले होते. लौकर येणार नव्हते. ही संधी बरी असे विजय व मुक्ता यांना वाटले. रुक्माकाकाने सर्व व्यवस्था केली. गाडीत बसून मुक्ता, तिचे वडील व रुक्मा जगदंबेच्या मंदिरात आली. तेथे दुसरेही दोन सद्गृहस्थ होते. एक उपाध्याय होता आणि विजयही आला. जगन्मातेसमोर विधिपुरस्सर सुटसुटीतपणे विवाह लागला. मुक्ता व विजय यांनी एकमेकांस माळा घातल्या. आनंद झाला.

विजय चार दिवस मुक्ताच्याच घरी राहिला. सारे नीट पार पडले, असे वाटले. एके दिवशी विजय आपल्या घरी जायला निघाला. त्याच्या घरी ही वार्ता गेलीच होती. तो वाटेत होता तोच त्याच्या गावचा ग्रामणी आला. त्याच्याबरोबर हत्यारी शिपाई होते. विजयला अटक करण्यात आली. ग्रामणीने त्याला गावाबाहेरच्या एका भीषण कारागृहात टाकले.

'का मला अटक? माझा अपराध काय?' विजयने विचारले.

'तुझ्या पित्याने तुझ्यावर नजर ठेवण्यासाठी मला सांगितले होते. तू पित्याच्या इच्छेविरुद्ध लग्न लावले आहेस. पित्याची आज्ञा मोडली आहेस. पिता येईपर्यंत मी तुला तुरुंगात ठेवणार. तो आल्यावर काय ते पाहू. पड आता या अंधारकोठडीत.'

'मी अन्नाला शिवणार नाही.'

'बरेच झाले. सुंठीवाचून खोकला गेला.'

असे म्हणून तो ग्रामणी गेला. विजय दुःखी झाला. तो आपल्या खोलीचे निरीक्षण करू लागला. खोलीच्या भिंती उंच होत्या. एक उंच बिनगजांची

खिडकी होती. त्या खोलीत एक उंच पेटारा होता त्या पेटाऱ्यावर तो उभा राहिला, उभा राहून त्याने वर उंच उडी घेतली व खिडकी धरली. त्याने खिडकीतून खाली पाहिले, तो खोल दरी होती. त्या खिडकीतून कसे पळता येणार ? खाली उडी कशी घेता येईल ? सुटकेचा मार्ग नाही. तो निराश झाला.

विजयच्या अटकेची वार्ता मुक्ताला कळली. ती घाबरली. तो ग्रामणी विजयवर सूड घेणार असे तिला वाटले. ती रडू लागली.

'रुक्माकाका, तूच उपाय सांग.' ती रडत म्हणाली.

'बारीक दोरी व जाड दोरी आण.' तो म्हणाला. तिने दिली.

'चल माझ्याबरोबर.' तो म्हणाला.

मुक्ता व रुक्मा लपत छपत तुरुंगाच्या दरीकडे भिंतीच्या बाजूस आली. बाणाच्या टाकाला बारीक सुतळी अडकवून रुक्माने त्या खिडकीतून बाण मारला. विजय घाबरला. तो बाण खाली पडला. तो त्याला ती दोरी दिसली. चटकन त्याच्या लक्षात सारे आले. कोणीतरी सुटकेची खटपट करीत आहे खास. तो तो धागा ओढू लागला. दोरी येत होती. आता जरा जाडी दोरी आली. आता आणखी जाडी. शेवटी एक मजबूत दोर आत आला. बाहेर आता अंधार पडू लागला. विजयने खोलीतल्या पेटाऱ्याला तो दोर गुंडाळून ठेवायचे ठरविले. पेटारा मजबूत आहे की नाही ते तो पाहात होता, तो त्या पेटाऱ्याचे झाकण एकदम निघाले. त्या पेटाऱ्यात कागद होते. कसले कागद ? अद्याप थोडा अंधुक प्रकाश होता. तो पाहू लागला. तो एके ठिकाणी मुक्ताच्या वडिलांच्या शेतीवाडीसंबंधीचे कागद होते. अरे चोरा ! मुक्ताच्या वडिलांना फसवलेस काय ? ते कागद त्याने आपल्याजवळ घेतले. त्याने ती दोरी त्या पेटीच्या खालून अगदी बळकट बांधली. बाहेरच्या लोकांनी खाली दोरी ताणून धरली. काळोख पडला. विजयने ईश्वराचे स्मरण केले आणि तो दोरीवरून चढू लागला. तो खिडकीत आला. हळुहळू तो बाहेर लोंबकळू लागला. मुक्ता पाहात होती.

'जपून, विजय जपून.' ती हळूच त्या दरीतून म्हणाली.

त्या शब्दांनी विजयचे थरथरणारे हात स्थिर झाले. तो खाली खाली येत होता. आला. उतरला. मुक्ताजवळ उभा राहिला. इतक्यात दूर दिवा दिसला. कोण येत आहे ? सुगावा लागला की काय ? विजय, मुक्ता व रुक्मा प्रचंड दगडाच्या आड बसली. तो दिवा जवळ जवळ येत होता. कोण होते ? हा

तर सुमुख व त्याच्याबरोबर कोण आहे ते? ती पांगळी मंजुळा! विजयला तुरुंगात टाकल्याचे कळल्यावर मंजुळा दुःखी झाली. ग्रामाधिपतीस इतक्या थरावर गोष्टी नेण्याचे काय कारण? असे तिला वाटले. विजयची सुटका केलीच पाहिजे होती. ती सुमुखला म्हणाली, 'सुमुख, आज भावाच्या उपयोगी पड. तू उंच भिंत चढतोस. दोरी कंबरेला बांधून चढ. बघ त्या तुरुंगाच्या भिंतीवरून चढता येईल का? आपण रात्री जाऊ. मी येईन बरोबर.' आणि सुमुखने कबूल केले. त्याच्याबरोबर रात्री कुबडया घेऊन मंजुळा निघाली. किती तिचे बंधुप्रेम! दगडाधोंडयांतून ठेचाळत ती येत होती. सुमुखच्या हाती कंदील होता. दोघे त्या दरीत आली. तो तेथे दोर आधीच बांधलेला.

'विजय सुटून गेला बहुधा.' मंजुळा म्हणाली.

'मी बघतो आत जाऊन. दोर आहेच. एका क्षणात आत जाऊन येतो.' सुमुख म्हणाला.

त्याने कंदील डोक्यावर नीट बांधला आणि दोरावर चढू लागला. भीषण देखावा! सुमुख त्या खिडकीतून आत शिरला. त्या कोठडीत उतरला. तो तेथे कोणी नाही. त्याने पेटी उघडली. तो आत सरकारी कागद. त्याने ते फाडले. फेकले. त्यांना आग लावून दिली आणि झपझप दोरीवरून पुन्हा खाली आला.

'गेला पक्षी पळून. चल घरी ताई.' तो म्हणाला.



यती की पती : प्रकरण सहावे

# मातृभूमीचा त्याग

मुक्ता, रुक्मा व विजय परत आली. विजय व मुक्ता यांचे हात एकमेकांच्या हातांत होते.

'रुक्माकाका, आज तुम्ही आमच्याकडेच झोपा. मला भीती वाटते.' मुक्ता म्हणाली.

'त्या दुष्टाला कळले तर तो दौडत येईल.' रुक्मा म्हणाला.

सारी झोपली.

इकडे तो तुरुंग शिलगला, पेटला, पहारेकरी जागे झाले. त्यांनी ग्रामणीस जाऊन सांगितले. तो दातओठ खात आला, तो तुरुंगात आला. तो कोठडीजवळ गेला. कागद पेटले होते. पेटी फोडलेली होती. चोर पळून गेला होता.

'धावा, त्या थेरड्याच्या घराला वेढा घाला. जा. विजयला जिवंत धरून आणा. जा. आता तो वाचत नाही. सरकारी इमारतीस त्याने आग लावली. आता मर लेका म्हणावे. जा, दौडा.' तो हुकूम देत होता.

मध्यरात्र झाली होती; परंतु रुक्मा जागा होता. तो धनुष्याच्या बाणांना धार लावीत होता. तो त्याने घोड्यांच्या टापांचा आवाज ऐकला. त्याने मुक्ताला हाक मारली. ती उठली. विजय उठला. संकट आले. मुक्ताने काय केले, तेथे एक पेटारा होता त्यात तिने विजयला लपविले. पेटाऱ्यावर अंथरूण घातले व ती निजून गेली. घोडेस्वार आले. मशाली पाजळून घरात शिरले.

'विजय कोठे आहे?' त्यांनी विचारले.

'तुम्ही तर त्याला तुरुंगात घातलेत. द्या ना माझा विजय. का छळता त्याला?' मुक्ता उठून म्हणाली.

'विजय इकडे नाही आला?'

'नाही.'

'तो तर पळून गेला तुरुंगातून.'

'येथे नाही आला.'

ते घोडेस्वार परत निघाले. गेले. विजयने आतून झाकण उघडले. तो बाहेर आला. सर्वांना आनंद झाला.

'विजय गुदमरला नाहीस ना?' तिने विचारले.

'नाही. भोक आहे मोठे पेटाऱ्याला.' तो म्हणाला.

पुन्हा सारी झोपली. घोडेस्वारांनी ग्रामणीस विजय तेथे नाही अशी बातमी दिली. तो संतापला. मी स्वतः येतो. त्या घरातच तो असला पाहिजे. पुन्हा सारे परतले.

पुन्हा कठीण प्रसंग. विजय पुन्हा पेटाऱ्यात शिरला. वरून नीट अंथरूण करण्यात आले. ग्रामणी आला. त्याने शोध शोध शोधले; परंतु विजय नाही. बराच वेळ बसून निराश होऊन तो निघाला. मुक्ता तळमळत होती. विजय गुदमरेल अशी तिला भीती वाटत होती. ग्रामणी माघारा वळताच तिने अंथरूण दूर केले. पेटारा उघडला, तो विजय निश्चल! हालचाल नाही. तिने किंकाळी फोडली. ती त्या ग्रामणीने ऐकली. काही तरी भानगड आहे असे त्याला वाटले. त्याने एकाला चौकशी करायला पाठवले. तो एकदम घरात आला, तो तेथे विजय मूर्च्छित पडलेला. रुक्मा त्याला सावध करीत होता. मुक्ता वारा घालीत होती.

'माझ्या पतीचे प्राण वाचवा. मला मुलगी माना. विजयचा काय आहे अपराध? आम्ही विधीने लग्न लावले आहे. माझी कीव करा.' ती त्या दूताच्या पाया पडून म्हणाली.

'मुली, निश्चिंत राहा; परंतु विजय सावध झाल्यावर त्याला येथे ठेवू नका. कोठे तरी दूर देशाबाहेर जाऊ दे.' असे म्हणून तो गेला.

'काय होती भानगड?' ग्रामणीने विचारले.

'ती मुलगी दुःखाने बेशुद्ध होऊन पडली. गरीब बिचारी.' तो करुणेने म्हणाला.

ते सारे जाऊ लागले. विजय इकडे सावध झाला. मुक्ताच्या प्राणात प्राण आले.

'विजय बरे वाटते ना?' तिने विचारले.

'तू जवळ आलीस म्हणजे का बरे वाटणार नाही?'

'विजय, तुला निघाले पाहिजे. काही दिवस तुला दूर गेले पाहिजे. येथे धोका आहे. तुझ्याबरोबर मी नाही येऊ शकत. बाबा एकटे; परंतु पुन्हा आपण भेटू. माईजींकडून राजाच्या कानावर घालू. नीघ राजा. रुक्माकाका व मी तुला पोचवतो. जंगलातले सर्व रस्ते रुक्माकाकाला माहीत आहेत. कर तयारी. तू रुक्माकाकांची तलवार बरोबर घे. रुक्माकाका धनुष्यबाण घेतील. मीही ही तलवार घेत्ये. चल, वेळ नाही गमावता कामा.'

मुक्ताच्या वडिलांच्या पाया पडून विजय निघाला. रुक्मा व मुक्ताही निघाली. गावाबाहेर पडून जंगलात घुसली. आता पहाट झाली होती. दिशा उजळू लागल्या. तो ग्रामणीला कोणी तरी बातमी दिली की, विजय पळून जात आहे. जंगलातून जात आहे.

ग्रामणी उलटला. हत्यारी सैनिक घेऊन निघाला. त्याने बरोबर शिकारी कुत्राही घेतला. रक्ताचा वास घेत कुत्रा जातो. तो रस्ता शोधतो. माणसाला हुडकून काढतो. जंगलात घुसलेले लोक आरडा-ओरड करू लागले. विजय, मुक्ता व रुक्मा यांच्या कानांवर तो गदारोळ आला. तिघे भराभर जात होती. आता चांगलाच दिवस उजाडला. पक्षी उडू लागले.

'विजय, मी या झाडाच्या आड उभा राहातो आणि जे येतील त्यांच्यावर बाण सोडतो. माझा बाण चुकणार नाही. तू त्या बाजूस जा. त्यांनी दोन तुकड्या केल्या आहेत. तलवार घेऊन तिकडे तू उभा राहा. मुक्ता, तू विजयच्या जवळ राहा, म्हणजे त्याला स्फूर्ती येईल.' रुक्माने सल्ला दिला.

त्याप्रमाणे ते तयारीने राहिले. ग्रामणीची माणसे येत होती. तो पाहा बाण सुटला. पडला एक. पुन्हा बाण, दुसरा पडला. तिसरा बाण, तिसरा पडला. हाहाःकार उडाला; परंतु तिकडे काय? तिकडे विजयनेही एकाला पाडले. दुसरे दोघे धावले. विजयच्या पायावर वार बसला; परंतु मुक्ताने वार करणाऱ्याचे मुंडके उडवले. ग्रामणीचे भाडोत्री लोक घाबरले, पळाले; परंतु ग्रामणी निवडक लोक घेऊन पाठीमागून येत होता. मुक्ताने पटकन पदर फाडून विजयची जखम



बांधली आणि विजयच्या रक्तापाठोपाठ कुत्रा येऊ नये म्हणून तलवारीने स्वत:चा पाय कापून घेतला. तिने आपले रक्त सांडले.

'विजय, तू तिकडे जा. मी इकडून येते.' ती म्हणाली. हेतू हा की, कुत्रा आपल्या रक्ताच्या वासाने यावा. पायाचे रक्त गळत होते. तो पाहा ग्रामणी व त्याचा कुत्रा. ते पाहा आणखी हत्यारबंद लोक आले; परंतु रुक्माने बाण मारून कुत्रा ठार केला. भराभर त्याचे बाण येऊ लागले. ग्रामणी घाबरला.

'तो विजय परदेशात जात असावा. परागंदा झाल्यावर तो माझे काय करणार आहे ? कशाला उगीच त्रास घ्या.' असे मनात ठरवून तो उरलेल्यांस म्हणाला,

'चला जाऊ माघारे. जाऊ दे पळून त्या पळपुट्यांना देशाच्या बाहेर. पीडा गेली म्हणजे झाले.' ते सारे माघारे वळले. रुक्माने एक बाण मारला. ग्रामणीस जरा चाटून गेला. ग्रामणी पळत सुटला. आता संकट नाही असे रुक्माला वाटले. तो विजय व मुक्ता यांना शोधीत आला. तिघांची गाठ पडली. रुक्मा रस्ता दाखवीत होता. तो मुक्ताच्या पायाकडे एकदम विजयचे लक्ष गेले.

'मुक्ता, काटा का ग लागला? किती रक्त गळत आहे. पाहू दे.' तो पाहू लागला. 'ही तर तलवारीची जखम. येथे कशी जखम झाली?'

'अरे, तुझ्यासाठी तिने पाय कापून घेतला. तिच्या रक्ताच्या वासाने कुत्र्याने यावे म्हणून. मुक्ता, किती तुझे विजयवर प्रेम! परंतु तुमची आज ताटातूट होणार. मला वाईट वाटत आहे; परंतु तुम्ही पुन्हा भेटाल. मी राजाकडे जाईन. मी जुना शिपाई आहे. राजाजवळून तुझ्यासाठी माफीपत्र आणीन हो, विजय.' रुक्मा मनापासून सांगत होता.

विजयने मुक्ताची जखम बांधली. विजयच्या खांद्यावर हात ठेवून ती जात होती आणि आता जंगल संपले. समोर अफाट मैदान होते. कनोजच्या राज्याची हद्द थोड्या अंतरावर असलेल्या नदीजवळ संपत होती. त्या नदीपलीकडे दुसरे राज्य. मग धोका नव्हता. ती तिघे तेथे बसली.

'विजय, जा आता. वेळ दवडण्यात अर्थ नाही. काळजी नको करू. मी आहे तुझ्या मुक्ताला.' रुक्मा म्हणाला.

विजय व मुक्ता! त्यांना एकमेकांस सोडवेना, दोघे सद्‌गदित झाली होती.

'विजय, पुन्हा कधी रे तू भेटशील? कधी तुझे गोड बोलणे, गोड हसणे पुन्हा मिळेल? कसे हे दुर्दैव! लग्न होऊन चार दिवसही आपण सुखाने एकत्र राहिलो नाही. का बरे ही ताटातूट? कोणते पाप आपण केले?'

'मुक्ता, रडू नको. सारे चांगले होईल. मी तुला विसरणार नाही. तू माझ्या हृदयात आहेस. तेथे तुला भावनांच्या रंगांनी रंगवीन. आपण पुन्हा लौकरच भेटू हो.'

'चला आटपा.' रुक्मा म्हणाला.

हातात तलवार घेऊन विजय निघाला. मुक्ता त्याच्याकडे पाहात होती. विजयही मागे पाहात होता. शेवटी तो दूर गेला. रुक्मा व मुक्ता माघारी आली. विजय त्या नदीतीरी आला. नदीचे पाणी प्याला. मातृभूमीचे शेवटचे दर्शन! तिला त्याने प्रणाम केला. ते पलीकडचे तीर! आणि तो परराज्यात शिरणार! जा, विजय, जा. शूराने डगमगू नये. जा.

※ ※ ※



यती की पती : प्रकरण सातवे

# परिभ्रमण



विजयने त्या नदीचे पाणी पिऊन, मातृभूमीला प्रणाम करून परतीरावर पाऊल ठेवले. तो दमून गेला होता. तेथे तो बसला; परंतु त्याला झोप येत होती. थोड्या अंतरावर एक उंच झाड होते. त्या झाडाच्या शीतल छायेखाली तो झोपला. त्याला गाढ झोप लागली. बऱ्याच वेळाने तो जागा झाला. तो उठला आणि निघाला.

हिंडता हिंडता एका शहराजवळ आला. अंधार पडू लागला होता. तेथे त्याला हालता चालता येत नाही असा, एक कसा तरी सरपटत येणारा मनुष्य आढळला.

'मला नेतोस का रे दादा उचलून?' त्याने विजयला विचारले.

'कोठे नेऊ?'

'ती पलीकडे एक झोपडी आहे तेथे ने.'

विजयने त्या माणसाला उचलून त्याच्या झोपडीत नेले. तेथे एक घोंगडी होती. तीवर त्याने त्याला ठेवले.

'दार लावा.' तो म्हणाला.

विजयने दार लावले. तो काय आश्चर्य? तो मनुष्य नीट हिंडू फिरू लागला. त्याने कपडे बदलले. आता अगदी छान दिसू लागला.

'तुम्ही येथे थांबा. मी काही खायला आणतो.' असे म्हणून तो मनुष्य गेला.

विजय आश्चर्य करू लागला, असा कसा हा मनुष्य? मघा याला चालता येत नव्हते, आता तर नीट चालतो. मघा घाणेरडा दिसत होता, आता झक दिसतो. हा लफंगा आहे की काय?

तो मनुष्य फळफळावळ, मेवामिठाई घेऊन आला.

'या, खायला या. मला घरी उचलून आणलेत. आता खायलाही मदत करा.' तो मनुष्य हसून म्हणाला.

'परंतु तुम्हाला चालायला कसे येऊ लागले?'

'आधी खायला तर या. खाता खाता सांगतो.'

ते दोघे फराळ करू लागले. तो मनुष्य म्हणाला, 'अहो, पोरांसाठी आम्हाला ही अशी सोंगेढोंगे करावी लागतात. कोणी दिवसा आंधळे होऊन भीक मागतात; परंतु रात्री त्यांना डोळे येतात. घरी येताच ते डोळस असतात. कोणी पांगळ्याचे सोंग करतात. कोणी हातापायांना फडकी गुंडाळून आपण महारोगी आहोत असे भासवतात. असे करावे लागते. माझी मुलेबाळे तिकडे एका गावी आहेत. माझा मुलगा येतो व येथे जमलेले भिक्षाद्रव्य नेतो. त्याने तिकडे घर बांधले आहे. शेतीवाडी आहे. आता मी पांगळ्याचे सोंग करून भीक नाही मागितली तरीही चालेल; परंतु सवय झाली इतक्या वर्षांची. चैन पडत नाही तसे न केले तर.'

असे तो पांगळा सांगत होता. विजय आश्चर्याने सारे ऐकत होता.

'आणि तुम्ही कोठले?' भिकाऱ्याने विचारले.

'मी लांबचा मुशाफिर आहे. परिव्राजक होऊन हिंडत आहे. पुरे पट्टणे पाहात आहे.'

'परंतु वाटेत खाणार काय?'

'तो प्रश्नच आहे. माझ्याजवळ काही नाही.'

'माझ्याबरोबर भिक्षा मागा. मी पांगळा होईन. तुम्ही मला हिंडवा. एका लाकडी गाडीवर घालून तुम्ही मला ओढत न्या. तुम्हाला गाणी येतात का? म्हणा गाणी. लोक भरपूर भीक घालतात. अहिंसेचा येथे धर्म आहे.'

'उद्याचा दिवस बघतो प्रयोग करून; परंतु मला असा देश आवडत नाही. अहिंसा म्हणजे का दंभ? तुम्ही उद्योग का करीत नाही? श्रमावे व खावे. लोकांना तुम्ही फसवता आणि हे बावळट लोकही फसतात. धर्माचे पुण्य दोघांनाही नाही.'

'तुमची अशा प्रकारची मते असतील तर जा. माझी नाही तर फजिती कराल आणि तुम्ही तरी आता प्रवासात श्रम करूनच खाणार असाल?'

तर मोठा कठीण प्रसंग आला. कोणा राजाचे शिपाई चोरांना पकडण्यासाठी म्हणून धावत होते. त्यांना विजय व विहारी हेच चोर वाटले. कोणाला तरी पकडले म्हणजे झाले.

'अरे ते पाहा. पकडा. हेच ते दोघे चोर. पकडा.' असा आवाज आला. विजय व विहारी पळू लागले, तो ते शिपाईही येत होते. पळता पळता समोर प्रचंड नदी आली. आता? ते शिपाई जवळ आले. त्या दोघांनी त्या पात्रात उड्या घेतल्या. ते शिपाई आता मात्र माघारे गेले. प्रवाहात ते दोघे सापडले. विजय उत्कृष्ट पोहणारा होता; परंतु विहारी दमला की काय? विजय त्याच्या मदतीस धावला. त्याने विहारीला तीराला आणले. दोघे पैलतीरी आले. आता निराळे राज्य. निराळा देश. शिपायांचे भय नव्हते आता.

'विहारी, सुटलो एकदाचे.'

'परंतु विजय, आपण कोठे आलो माहीत आहे?'

'कोठे?'

'माझ्या राजाचा हा प्रदेश. मी पुन्हा माझ्या राजाच्या हद्दीत आलो. ही नदी हद्द आहे. ते शिपाई पाठीस लागले म्हणून यावे लागले. चल, आता माझा देश तुला दाखवतो. माझ्या गावी तुला नेतो. सस्यश्यामल सुंदर प्रदेश.'

खरोखरच तो रमणीय प्रदेश होता. हिरवीगार झाडे दिसत होती. जमीन कशी काळसर परंतु जरा भुरकी अशी होती. पेरूच्या बागा होत्या. अंजिरांच्याही होत्या. हिरवे पोपट अंजिरांच्या व पेरूच्या बागांतून उडत होते. एके ठिकाणी बागवानाने त्यांना भरपूर फळे दिली. त्याचा मोबदला म्हणून विहारीने एक विनोदी गोष्ट सांगितली.

'बुद्धभिक्षू फार छान गोष्टी सांगतात.' बागवान म्हणाला.

'मी भिक्षू व्हावे असे माझ्या बाबांना वाटे.' विजय म्हणाला.

'तुमच्यासारख्या राजबिंड्या तरुणाने का भिक्षू व्हावे? राजाच्या मुलीला तुम्ही नवरा शोभाल.' बागवान म्हणाला.

'खरे आहे, खरे आहे.' विहारी हसून म्हणाला.

ते दोघे पुन्हा निघाले. एका मैदानात आले. तो तिकडून घोडेस्वारांची एक तुकडी येत होती.

'राजा, आमच्या देशाचा राजा.' विहारी म्हणाला.

'कोठे चालले हे सैन्य?' विजयने विचारले.

'कोठे तरी लढाईला.' विहारी म्हणाला.

त्या घोडेस्वारांतील एकाने विहारीला पाहिले.

'पळालेला विहारी तो बघा.' त्याने सेनानायकाला सांगितले.

राजाच्या कानांवर गेली ती वार्ता.

'जा, त्याच्या मुसक्या बांधून आणा.' हुकूम झाला.

घोडेस्वार दौडत आले.

'विहारी, चल आमच्याबरोबर. युद्ध सुरू झाले आहे. प्रत्येकाने देशासाठी लढायला आले पाहिजे.' ते म्हणाले.

'मला नका नेऊ.'

'राजाची आज्ञा आहे.'

'कोण नेतो माझ्या मित्राला पाहू. हा मी येथे उभा आहे. होऊ देत दोन हात.' विजय तलवार सरसावून म्हणाला.

'विहारी, तुझ्या या कोवळ्या मित्रास गप्प बसव. तू बऱ्या बोलाने चल. नाही तर दोघे प्राणास मुकाल. तुम्ही दोघे आहात. आमची पलटण तेथे उभी आहे. बसा या घोड्यावर, निघा.'

विहारीनें विजयची समजूत घातली. ते दोघे एकमेकांस कडकडून भेटले. विहारीच्या डोळ्यांना पाणी आले. गेला. विहारी गेला. डोळ्यांआड झाला. प्रेमळ, शूर, विनोदी मित्र गेला. पुन्हा विजय एकटा. देवाने मला का एकटे राहाण्यासाठीच जन्माला घातले? मुक्ताची व माझी ताटातूट. विहारीची नि माझी ताटातूट. मी यती व्हावे, निस्संग व्हावे, सर्व पाशांतून मुक्त व्हावे, मी एखाद्या व्यक्तीचे न होता सर्व जगाचे व्हावे अशीच का देवाची खरोखर इच्छा आहे? मी यती होऊ की पती होऊ? संन्यासी होऊ की संसारी होऊ? देवाच्या इच्छेविरुद्ध का मी जात आहे? असे विचार करीत तो पुढे निघाला.

※ ※ ※

यती की पती : प्रकरण आठवे

# चोरांच्या हातून सुटका

हिंडत हिंडत विजय एका मोठ्या शहरी आला. तेथे त्याची काही व्यापाऱ्यांशी गाठ पडली. त्यांतील एक व्यापारी त्याच्या मोठ्या भावाच्या ओळखीचा निघाला. विजयचा मोठा भाऊ अशोक एका व्यापाऱ्याकडे होता. अशोकची व त्या व्यापाऱ्याची ओळख होती. ते व्यापारी परत जाणार होते.

'तुम्ही माझ्या भावाला पत्र द्याल?' विजयने विचारले.

'हो. अवश्य देईन.' तो व्यापारी म्हणाला.

विजयने अशोकला एक पत्र लिहिले आणि दुसरे एक मोठे पत्र मुक्ताला लिहिले. ते मुक्तासाठी लिहिलेले पत्र त्याने अशोकच्या पत्रात घातले व ते मुक्ताकडे पोचते करण्याविषयी भावाला कळकळीने सांगितले होते. त्या मुक्ताच्या पत्रात आपण पुढे साधारण कोठे जाऊ तेही त्याने कळविले होते. त्या पत्रात काय काय होते ते तुम्हाला जाणण्याची इच्छा आहे का? हे घ्या ते पत्र.

*प्रियतम मुक्ता,*

*तू व रुक्मा परत गेलात आणि मी ती नदी ओलांडून पलीकडे आलो. मातृभूमीकडे किती तरी वेळ शेवटचे पाहात होतो; परंतु शेवटी निघालो. निरनिराळ्या देशांतून जात होतो. भिकाऱ्यांचे विचित्र प्रकार पाहिले. कोणी आंधळे नसून आंधळे झालेले. पांगळे नसून पांगळे झालेले. मी त्यांच्या संगतीत राहिलो नाही. एके ठिकाणी चोर पाठीस लागल्यामुळे गाईच्या गोठ्यात लपलो. गवाणीतील गवतात झोपलो; परंतु माझे धोतरच गाईने चघळले; परंतु मी तिचे दूध भरपूर पिऊन नुकसानभरपाई करून घेतली*

आणि पुढे विहारी नावाचा एक प्रवासी मित्र भेटला. फार प्रेमळ, उदार व शूर. विनोदी त्याचा स्वभाव. रुक्माची मला आठवण झाली; परंतु रुक्माच्या इतका हा वृद्ध नव्हता. विहारी सैनिक होता. सैन्यातून तो पळाला होता. आम्ही दोघे एकदा जंगलातून जात होतो. विहारीने अस्वलिणीचे एक पिलू मारले आणि त्या पिलाची आई मग खवळून आली. कोण तारांबळ आमची. आम्ही झाडांवर चढलो. मी ज्या झाडावर चढलो त्या झाडावर ती अस्वलीण आली. तिने उडी मारून पायावर पंजा मारला. मी पटकन् वर गेलो. आडव्या फांदीवर गेलो. आडव्या फांदीवर वाघ, अस्वल यांना पटकन जाता येत नाही. हळुहळू अस्वलीण येऊ लागली. मी अस्वलिणीकडे तोंड करून सरकत सरकत फांदीच्या टोकाला गेलो. खाली पडतो तरी मरतो. अस्वलिणीचा श्वास मला लागत होता. इतकी ती जवळ आली. तुझी आठवण झाली. मी मरणार असे वाटले; परंतु इतक्यात नवीन मित्र खाली उतरला. त्याने बाण मारला. अस्वलीण लोंबकळली. तरीही ती सरकत येत होती; परंतु कडाड्. एकदम फांदी मोडली. मी व ती अस्वलीण दोघे खाली पडलो. ती अस्वलीण त्या मित्रावर धावली, इतक्यात मी सावध होऊन तलवार घेऊन धावलो. त्या संतापलेल्या पशूवर केला प्रहार! ती माझ्याकडे वळली. घोंघूं करीत आली; परंतु विहारीने पुन्हा नेमका बाण मारला. ती माता मरून पडली. तुझा विजय वाचला. तुझे प्रेम मला सांभाळीत आहे. मंजुळाताईचे प्रेम मला सांभाळीत असेल.

आम्ही पुढे निघालो. तो आम्हालाच चोर समजून शिपाई पकडण्यासाठी पाठोपाठ येत होते. विहारी व मी दोघांनी प्रचंड नदीत उड्या घेतल्या. आम्ही पैलतीरी आलो. दोघे निघालो. विहारी पूर्वी ज्या पथकात होता, ते पथक जात होते. विहारीला त्यांनी लढाईसाठी म्हणून नेले. त्याला वाईट वाटले. तो माझ्यावर फार प्रेम करी. मला धीर देई. त्या विनोदी शूर शिपायाच्या डोळ्यांतही निरोप घेताना पाणी आले. गेला. माझ्या जीवनात कायमची वस्ती करून तो गेला.

पुन्हा मी एकटा. या शहरात आलो. येथे अशोकच्या ओळखीचा एक व्यापारी भेटला. त्याच्याबरोबर हे पत्र पाठवीत आहे. अशोक हे तुझ्याकडे रवाना करील. अशोकचे माझ्यावर प्रेम आहे.

मुक्ता, मी येथून राजगृहाला जाणार आहे. तेथे कलेला उत्तेजन आहे. तेथे मी कीर्ती मिळवीन. तेथे नाना देशाचे व्यापारी येतात. मी तेथे गेलो म्हणजे तुला पत्र पाठवीन. मी तिकडे येणे सुरक्षित आहे की नाही ते कळव. तुझ्या भेटीसाठी मी तळमळत आहे. मुक्ता, माझ्या घरी तू कधी गेली होतीस का? माझ्या बाबांचा अद्याप माझ्यावर राग आहे का? आई काय म्हणते? सुमुख माझे नाव ऐकताच संतापतो का? परंतु माझी सुटका करण्यासाठी त्या रात्री तोही आला होता आणि प्रेमळ पंगू मंजुळाताई! माझ्यासाठी त्या दरीत ती आली. सुमुखला घेऊन आली. कुबड्यांच्या आधाराने आली. माझ्यावर तिचा किती लोभ! आमच्या घरातील ती कर्तव्यमूर्ती आहे, प्रेमदेवता आहे. ती सर्वांना सांभाळते, भांडणे मिटवते. तिला कधी तू भेटली होतीस का? हे पत्र माझ्या घरी जाऊन वाचून दाखव. सर्वांना माझे सप्रेम प्रणाम सांग. सर्वांच्या आशीर्वादाने व प्रेमाने मी जिवंत आहे. तुमची माझी गाठ पडावयाची आहे, म्हणून तर मी सर्व संकटांतून आतापर्यंत वाचलो व पुढेही वाचेन. नाही का?

मुक्ता, माईजींनाही माझे पत्र दाखव. त्यांनी मला कला दिली. कलेचे अंतरंग दाखविले. हे त्यांचे उपकार. त्यांचे आपल्या लग्नाला आशीर्वाद होते. मी त्यांना विचारले होते. बाबांचे करणे माईजींना पसंत नव्हते. राजाकडून त्या पत्रही मागवणार होत्या. त्यांना सांग की, विजय राजगृह येथे जाऊन कलेची अधिक उपासना करणार आहे. तुमचा, म्हणावे, आशीर्वाद द्या.

मुक्ता, तुझे वृद्ध पिताजी कसे आहेत? रुक्माची व त्यांची बुद्धिबळे चालत असतील ना? मी तुमच्यात फिरून कधी बरे येईन? तुला कधी भेटेन? रोज वाऱ्यावर मी तुला निरोप पाठवतो. पाखरांबरोबर संदेश देतो. तुला कळतात का? मला पक्षी होता आले असते तर? अशी एखादी जादू येत असती तर? एकदम तुझ्याकडे येऊन तुझ्या खिडकीत बसलो असतो. पाखरांच्या भाषेत तुझ्याजवळ बोललो असतो. तू मला हाकलले असतेस का ग? का तुलाही ते पाखरू आवडले असते?

*मुक्ता, तू रडत नको बसू. निराश नको होऊ. आपण लवकरच भेटू. सुखाचा संसार करू. देव पुन्हा आपली ताटातूट करणार नाहीं. अशी प्रेमळ जीवने सदैव का तो दूर ठेवील? खरे ना? पूस तर मग अश्रू व गोडशी हस बघू. माझ्यासाठी तरी हसत जा.*

*तुझा विजय*

असे पत्र अशोकच्या पत्रात त्याने घातले. व्यापाऱ्यांचा निरोप घेऊन तो पुढे निघाला. आता पुढे दाट जंगल होते. दुसरेही काही प्रवासी होते, त्यांच्याबरोबर तो निघाला. त्यांना वाटेत आणखी लमाण भेटले. मोठाच तांडा होता; परंतु विजय विचारात रंगला होता. तो मागे राहिला. तांडा गेला पुढे. विजय आता झपाट्याने चालू लागला. तो एके ठिकाणी दोन रस्ते होते. अंधार पडला होता. कोणत्या रस्त्याने जावयाचे? त्याने डाव्या बाजूचा रस्ता घेतला. बराच वेळ झाला तरी त्याला कोणी भेटेना. इतक्यात त्याला दूर एक दिवा दिसला. तो त्या रोखाने आला, तो तेथे एक उंच लाकडी हवेली होती. ''प्रवाशांसाठी खाणावळ'' अशी त्या हवेलीवर पाटी होती.

'या. वाटसरू दिसता.' तेथील मनुष्य म्हणाला.

'मी थकून गेलों आहे; रात्रभर मुक्काम केला तर चालेल ना?'

'हो, दोन दिवस राहिलात तरी चालेल.'

विजय त्या माणसाबरोबर आत शिरला. आत आणखी बरेच इसम होते. कोण होते? तेही वाटसरू होते का? का शेजारचे कोणी होते? दिसत होते उग्र.

ती इमारत फार जुनी होती. जिन्याने विजयला घेऊन तो मनुष्य वर वर चालला. अगदी शेवटच्या मजल्यावरील लहानशा खोलीत त्याने विजयला आणले.

'हा येथे बिछाना आहे. येथे वारा फार छान येतो. बसा. लवकरच ताट पाठवतो.' असे म्हणून तो मनुष्य गेला. तेथे एक खिडकी होती. खिडकीच्या समोर एक प्रचंड पवनचक्की होती. पवनचक्कीचे हात जवळजवळ खिडकीपर्यंत आले होते. किती खोल होते खाली!

इतक्यात एका माणसाने जेवण आणून दिले. बाहेर आता चंद्र उगवला होता. खिडकीतून सुंदर चांदणे आत आले. विजय आता अंथरुणावर पडला.

'मी फसवणार नाही. मला चित्रे काढता येतात. कोणाला चित्र काढून देईन. देईल तो मला काही. मी गाणे म्हणेन. देईल कोणी काही. मी कोठे धर्माचे प्रवचन करीन. मिळेल मला काही. मी फसवणार नाही. मी आपला जातो. रात्रभर येथे झोपू दे.'

विजय रात्रभर तेथे झोपला आणि पहाटे उठून निघून गेला. शहरातून हिंडत हिंडत जात होता. त्याच्याजवळ थोडे पैसे होते. त्याने काही खायला घेतले. तो शहराबाहेर आला. नदी होती तेथे ते आणलेले खाल्ले. पाणी पिऊन विश्रांती घेऊन तो पुन्हा निघाला.

मुक्ताची त्याला आठवण येत होती. ती रडत असेल बिचारी, असे मनात येऊन त्याला वाईट वाटे. आता जवळपास गाव नव्हते. तो जात होता. अंधार पडला. इतक्यात कोणी तरी येत आहे पाठोपाठ, असे त्याला वाटले. तो घाबरला. त्याची तलवार जवळ होती, परंतु तो एकटा होता. तो पळत सुटला. एका घराजवळ त्याला गुरांचा गोठा दिसला. तो त्या गोठ्यात घुसला. गाईच्या पुढील गवाणीत लपला. गवतात झोपला. ते पाठलाग करणारे आले. त्यांनी गोठ्यात पाहिले. कोणी नाही. ते गेले निघून. विजयने गोमातेचे आभार मानले. तो थकला होता. तेथेच गवताच्या उबेने तो झोपी गेला.

पहाटे जागा झाला, तो त्याला काय दिसले? त्याच्या अंगावरचे धोतर गाईने खाल्ले होते! त्या गाईला कपडे खाण्याची सवय होती. त्याचे धोतर ती चघळीत होती. त्याला आता निघाले पाहिजे होते. त्याला भूक लागली होती. तो मनात म्हणाला, 'गाई गाई, तू माझे धोतर खाल्लेस. आता तुझे दूध मला पोटभर पिऊ दे.' तो गाईजवळ गेला आणि दुधाच्या धारा आपल्या तोंडात पिळू लागला. त्याने आपल्या तोंडाची जणू चरवी केली. गाईने लाथ मारली नाही. धोतराचा तुकडा चघळीत होती व दूध देत होती. भरपूर पान्हा. जणू तो गाईचा वत्सच होता. दूध पिऊन विजय तेथून बाहेर पडला.

तो असा जात होता. तो त्याला वाटेत एक मुशाफिर भेटला. चाळिशी उलटलेला असा तो दिसत होता. तो सैनिक असावा. त्याच्याजवळ तलवार होती. धनुष्यबाण होते. कोण होता तो?

'नमस्ते. कोठे जाता?' त्याने विचारले.

'नमस्ते. आपण कोठे जाता?' त्या मुशाफिराने विचारले.



'माझे काही ठरलेले नाही. परिभ्रमण करीत आहे.'

'माझेही काही ठरलेले नाही. चला दोघे बरोबर जाऊ.'

विजय व तो मुशाफिर बरोबर जाऊ लागले. त्या मुशाफिराचे नाव विहारी असे होते. ते नाव ऐकून विजयला आनंद झाला.

'विहारी. छान नाव. खरेच तुम्ही विहारी आहात. जगात हिंडावे, फिरावे, चिंता ना काळजी. खरे ना विहारी?'

'हां, पण तुम्ही भेटलात, छान झाले. मला एकट्याला हिंडणे जड जात होते. मी राजाच्या सैन्यात होतो; परंतु मी पळून आलो. ते सैन्यागारात नुसते पडून राहाणे मला आवडेना. मला मोकळे जीवन आवडते. चला, दोघे हिंडू.'

दोघे जात होते. विहारी मोठा विनोदी होता. तो विजयला हसवी. कितीतरी दिवसांत विजय इतके हसला नव्हता. त्याला मजा वाटली आणि जाता जाता आता एक जंगल लागले. किर्र झाडी. तो ते पाहा कोण येत आहे ते! कोण हे सावज? हे अस्वलाचे पिलू दिसते. त्या सैनिकाने बाण मारला. ते पिलू मेले.

'कशाला मारलेत?' विजय म्हणाला.



'अरे, रानातून जाताना काही खायला न मिळाले तर? आणि अस्वलाचे कातडे पांघरायला छान.' असे म्हणून त्याने ते पिलू खांद्यावर उचलून घेतले. ते निघाले. तो त्यांना एकदम कोणीतरी धावून येत आहे असे दिसले.

'अरे बापरे. त्या पिलाची आई!' विजय भीतीने उद्गारला.

'अरे बापरे!' तो विहारी म्हणाला.

आली. ती अस्वलीण जवळ आली.

'पळ, पळ, त्या झाडावर चढ.' विहारी ओरडला.

विहारीही एका झाडावर चढला. विजय चढत होता, तो ती अस्वलीण एकदम विजयच्याच झाडावर चढली. विजयच्या पायाचा ती लचकाच तोडती; परंतु विजय झटकन वर गेला. ती अस्वलीणही येत होती. आता काय करायचे?

'विजय, आडव्या फांदीवर हो.' विहारी ओरडला.

विजय आडव्या फांदीवर वळला. ती आडवी फांदी सरळ गेली होती. विजय अस्वलिणीकडे तोंड करून फांदीला धरून धरून जात होता. तो ती अस्वलीणही थोड्या वेळाने येऊ लागली. त्या फांदीवर तोल सांभाळून येणे त्या अस्वलिणीस अवघड जात होते, तरीही ती येत होती. पुढे पुढे येत होती. विजय मागे मागे

जात होता. तो फांदी वाकली. दोघांचा भार त्या फांदीस सहन होईल का? आणि खाली जमीनही दूर. इतक्या उंचीवरून पडणे म्हणजेही मरणे होते. त्या अस्वलिणीचे कढत सुस्कारे विजयला भासत होते. जणू मृत्यूच चाटायला, गिळायला येत होता.

इतक्यात विहारी खाली उतरला. त्याचा भाता घाईत खाली पडलेला होता. त्याने एक बाण घेतला व अस्वलिणीस मारला, तशी ती कोलमडली. तरीही त्या फांदीत नखे रोवून ती उलटी लोंबकळत होती. विजयकडे पाहून भयंकर ओरडत होती. घूं घूं करीत होती; परंतु त्या अस्वलिणीचे ते लोंबते वजन आणि विजयचे वजन यांनी ती फांदी कडाड मोडली. ती अस्वलीण आणि विजय खाली पडली. अस्वलिणीच्या अंगात बाण घुसलेला होता. तरी ती विहारीच्या अंगावर जोराने धावली. विहारी घाबरला. तो इकडे विजय सावध झाला. त्याने तलवार घेतली व अस्वलिणीवर वार केला. ती उलटली. त्याच्या अंगावर आता ती धावली. मारला तिने पंजा. तो तिकडून विहारीने पुन्हा बाण नेमका मारला. अस्वलीण मेली! पिलाजवळ माताही मरून पडली.

विजय व विहारी मातेच्या त्या बलिदानाकडे बघत होते.

'पाहा हे प्रेम.' विहारी म्हणाला.

'विहारी, मी जंगलातून पळून येत असता माझ्या मुक्ताने असेच प्रेम दाखविले होते. तिने स्वतःचा पाय कापून घेतला. कुत्रा तिच्या रक्ताच्या पाठोपाठ यावा व मी वाचावे म्हणून. कधी बरे मुक्ता पुन्हा भेटेल?'

'विजय, संसारात कशाला पडतोस? तू व मी दोघे असेच हिंडत राहू. तू का मला सोडून जाणार एके दिवशी? मला फार आवडतोस. तुझ्याबरोबर सर्व त्रिभुवनात हिंडावे असे मला वाटते.'

'विहारी, मुक्ता माझ्यासाठी रडत असेल. संसार का वाईट आहे? संसारही चांगला करता येतो. विहारी, तू आमच्याकडे ये. आमचा देश चांगला आहे. कसे पाणी, कशी जमीन! येशील? तू आमच्याकडे राहा.'

'पाहू. परंतु मला एके ठिकाणी राहाणे आवडत नाही. रोज नवीन प्रदेश, नवीन देखावे, परंतु तुझी जखम बांधू ये आधी.' जखम बांधली गेली. बोलत बोलत ते पुन्हा निघाले. अस्वलीण व तिचे पिलू यांची विहारीने कातडी काढून घेतली. एक विजयच्या अंगावर त्याने टाकले. एक स्वतःच्या; परंतु एके ठिकाणी

तो हे काय? असे काय हे अंथरूण? अंथरूण कशावर आहे? खाली पोकळी आहे की काय? तो घाबरून उठला. बारीक कामट्यांवर ते अंथरूण पसरलेले होते. त्याने बाजूला होऊन खाली हात घातला तो पोकळी! खड्डा आहे की काय? किती खोल आहे? त्याने बाजूचा एक दगड उकरून खाली टाकला, तो डुब् आवाज झाला. अरे बापरे, विहीर! खोल विहीर आहे. त्या विहिरीवर आपले अंथरूण आहे. रात्री झोपेत या कामट्या वजन सहन न होऊन मोडल्या असत्या व आपण विहिरीत पडलो असतो! विजय घाबरला. भ्याला. त्याच्या अंगावर काटा उभा राहिला. ही खाणावळ नाही तर! हे चोर आहेत. प्रवाशांना लुटणारे चोर. प्रवाशांना विहिरीत पाडून त्यांचे सारे लुटणारे चोर. आता सुटका कशी व्हायची? येथून जिन्याने खाली नाहीच जाता येणार? ते अडवतील. मग?

तो उठला. तो हळूच खाली गेला. मधली सारी दारे बंद करून तो पुन्हा वर आला आणि खिडकीजवळ आला. त्याच्या बिछान्याखाली पेंढा होता. त्याने त्या पेंढ्याची दोरी वळली. पिण्यासाठी पाणी तेथे होते. पाण्यात भिजवून त्याने चांगले वेठण तयार केले. मजबूत वेठण. त्याने ते खिडकीला बांधले. दुहेरी करून बांधले आणि काय करणार? ती दोरी तुटली तर? आयुष्याची दोरी बळकट असली तर जगू. नाही तरी येथे आत मरण आहेच. त्याने ती दोरी धरली. तो बाहेर उतरला. तो लोंबकळत राहिला. दोरी जमिनीपर्यंत थोडीच होती? त्या पवनचक्कीचा हात पकडायचा असा त्याचा बेत होता. त्याने दोरीचा एक हात धैर्याने सोडला आणि त्या हाताने पवनचक्की धरली. चक्की बळकट धरून त्याने दोरीचा हात सोडला; परंतु इतक्यात त्याचा हात सुटला! अरेरे! धाडकन् तो खाली पडला; परंतु तो गवतावर पडला. त्या पवनचक्कीच्या खाली गवत साठवलेले होते. त्या गवतावर अलगद तो पडला. त्याला लागले नाही. जणू देवाने वाचवले.

त्याच्या डोक्यात आता एक विचार आला. त्याने ते गवत त्या इमारतीभोवती चोहोबाजूला पसरून त्याला आग लावून दिली. त्याच्याजवळ चकमक होतीच. ते वाळलेले गवत एकदम पेटले. विजय दूर जाऊन उभा राहिला.

वरचा प्रवासी अजून विहिरीत कसा पडत नाही, अजून आवाज कसा होत नाही याची वाट ते चोर पाहात होते. ते आपल्या हत्यारांना धार लावीत होते;

परंतु सभोवती आग पेटत येत होती याची त्यांना कल्पनाही नव्हती. त्या इमारतीच्या तळमजल्यात तेल, राळ वगैरे ज्वालाग्राही पदार्थ होते. त्यांनी पेट घेतला. प्रचंड आवाज झाला. आता आग गहिरीच भडकली. ज्वाळा उंच जाऊ लागल्या. सर्वत्र प्रकाश पसरला. ते चोर घाबरले. ते वर जाऊ लागले.तो दारे आतून बंद. त्यांनी दारे फोडली. ते अगदी वरच्या मजल्यावर आले. तो मुशाफिर तेथे नाही ! त्यांनी खिडकीतून पाहिले तो, तो प्रवासी खालून हसत होता.

'पडा आता थंडगार विहिरीत. आगीत जळा किंवा पाण्यात मरा.' तो खालून ओरडला.

ती इमारत लाकडी होती. जुनी होती. भराभर पेटली. त्या चोरांना उडी टाकवेना. एकाने हिय्या केला व खाली उडी मारली, परंतु आता खाली गवत नव्हते. त्याचा पाय मोडला; परंतु तरीही तो विजयचा सूड घेण्यासाठी तसाच धावला; परंतु विजय काही कमी शूर नव्हता. त्याचे मुंडकेच विजयने उडविले. बाकीचे आगीत भस्म झाले. त्या हवेलीच्या ज्वाळा जंगलभर पसरल्या. प्रचंड होळी. विजय आता चालू लागला. तो त्याला तो तांडा भेटला. त्या ज्वाळा पाहून तो तांडा इकडेच येत होता.

'कोणी पेटवली ही खाणावळ?' त्यांनी विचारले.

'मी. सारे चोर भस्म झाले. एक येथे लढाईत मरून पडला.' असे म्हणून विजयने सारी हकीगत सांगितली.

'विजय, तू फार थोर कृत्य केलेस. अनेक व्यापाऱ्यांना या चोरांनी आजपर्यंत मारले. तू हे जंगल आता निरुपद्रवी केले आहेस. व्यापाऱ्यांवर, जाणारायेणारांवर तुझे उपकार आहेत. तुझे नाव सारे घेतील. तुझी कीर्ती सर्वत्र जाईल.' असे तांड्यातील लोक म्हणाले.

त्यांच्याबरोबर विजय निघाला. त्याचे आता सारे कौतुक करीत. रस्त्यात त्याला चांगले अंथरूण करून देत. त्याला चांगले जेवायला देत. तो जणू त्यांचा देव झाला.

पुढे त्या तांड्याचा नायक त्याला म्हणाला, 'तुम्हाला राजगृहाला जायचे ना? आता हा रस्ता घ्या. पुढे मग गंगा नदी लागेल. गलबते जात येत असतात. एखाद्या गलबतात बसा व राजगृहाला जा. तुमचा उत्कर्ष होईल. तुमच्या चित्रकलेची तेथे तारीफ होईल. त्या राजधानीत कुबेरासारखे व्यापारी आहेत.

मोठमोठे अमीर उमराव आहेत. त्यांचा तुम्हाला आश्रय मिळेल. प्रभू तुम्हास यश देवो व एक दिवस तुमच्या पत्नीची व तुमची भेट होवो.'

विजय त्या मित्रांचा निरोप घेऊन एकटाच निघाला. 'या सर्व संकटांतून कोण मला तारीत आहे? कोण माझा सांभाळ करीत आहे? मुक्ता! माझी मुक्ताच जणू माझा सांभाळ करीत आहे. तिचे अपार प्रेम माझे रक्षण करीत आहे. मुक्ता! तू कधी भेटशील? सर्वांचे मला आशीर्वाद मिळत आहेत. ते का खोटे होतील? तू भेटशील मला.' असे मनात म्हणत तो निघाला.

※ ※ ※



यती की पती : प्रकरण नववे

# राजगृहात



एका मोठ्या गलबतात बसून विजय जात होता; परंतु काय असेल ते असो. प्रचंड वादळ एकदम सुरू झाले. शांत प्रवाहात प्रचंड लाटा. आता काय करणार? असे वादळ कधी झाले नव्हते. वृक्ष कडाड् कडाड् पडत होते. घरांवरची छपरे उडून जात होती आणि या गलबताचे काय होणार? राजगृह राजधानी जवळ येत होती; परंतु गलबताचा भरवसा दिसेना. शेवटी ते गलबत उलटले. सारे पाण्यात पडले. अनेक प्रवासी! हलकल्लोळ माजला. कोण कोणाला आधार देणार? परंतु विजय उत्कृष्ट पोहणारा होता. तो मदत करीत होता. ती पाहा एक गरीब बाई. तिच्याजवळ लहान मूल आहे. कशाच्या तरी आधाराने ती बाई आहे. विजय बाणासारखा पाण्यातून धावला. त्याने ते मूल घेतले. एका हाताने ते वर धरून एका हाताने तो पोहत गेला. ते मूल तीरावर ठेवून पुन्हा आला. त्याने त्या बाईलाही तीरावर आणले. त्याने त्या मुलाला जिवंत केले. त्या मातेने कृतज्ञतेने त्याच्याकडे पाहिले.

विजय निघून गेला. तो आता पायी चालत चालत राजधानीला आला. कोठे उतरणार? एके ठिकाणी एक प्रवासी मंदिर होते. तेथे तो गेला. मालक बाहेर आला. बोलणे झाले. विजयला राहायला जागा मिळाली. प्रशस्त अशी ती खोली होती. मालक फार सज्जन होता. त्याने विजयची नीट व्यवस्था केली. विजयने भोजन केले. स्वच्छ अशा शय्येवर तो बसला होता.

'आपण कोण? कुठले?' धन्याने विचारले.

'मी कनोजकडचा आहे. अभागी तरुण आहे.'

'तुम्ही राजपुत्रासारखे दिसता. तुम्ही अभागी कसे? राहा आमच्याकडे. तुम्हाला पाहून मला फार आनंद झाला. माणसाच्या मुद्रेवरून मी परीक्षा करतो. तुम्ही फार थोर असे तरुण आहात, असे मला वाटते. तुम्ही कलावान् आहात का?'

'चित्रकला मला येते.'

'वा! या राजधानीत तुम्ही लवकरच नाव मिळवाल.'

'पाहू या.'

'मी तुमच्या ओळखी करून देईन. तुमचे नमुने नेऊन दाखवीन. तुम्ही चित्रे तयार करा. मी रंग, पुठ्ठे वगैरे आणून देईन.'

तो धनी गेला. विजय शांतपणे झोपी गेला.

दुसऱ्या दिवशी तो राजधानीत हिंडला. त्याला आनंद झाला. त्याला रंग, कुंचले वगैरे सारे सामान मिळाले. त्याने एकदोन सुंदर चित्रे तयार केली.

'अप्रतिम, खरेच अप्रतिम.' तो धनी म्हणाला.

'कोणाला दाखवू ही?'

'मी ही घेऊन सरदाराकडे जाईन. त्याच्या मुलीला चित्रकलेचा फार नाद. तिला ही चित्रे पसंत पडतील.'

'तुम्हाला एक विचारू का?'

'विचारा.'

'येथून कनोजकडे जाणारा एखादा व्यापारी भेटला तर त्याच्याबरोबर पत्र द्यायचे आहे.'

'माझ्याकडे पत्र देऊन ठेवा. सर्व हिंदुस्थानचे व्यापारी येथे येतात.'

विजयने आपल्या भावाला, अशोकला पत्र लिहिले व त्यात एक पत्र मुक्ताला लिहिले. प्राणावरची नवीन संकटे, त्यांतून सुटका कशी झाली ते सारे लिहून आता मी राजगृहात आहे, तू तेथे पत्र पाठव. मला मिळेल. असे त्याने लिहिले होते. त्याने आपल्या घरमालकाचा पत्ता दिला होता.

विजयने पत्र आपल्या घरमालकाजवळ दिले.

'व्यापाऱ्यांकडे या पत्राचे उत्तर येईल. आपल्याकडे आणून देतील पत्र आले तर.' तो मालक म्हणाला.

पत्र गेले.

विजयची चित्रे एके दिवशी घरमालकाने त्या सरदाराकडे नेली. सरदाराची मुलगी सुलोचना आपल्या चित्रशाळेत बसली होती. चित्रे घेऊन तो मालक तिच्याकडे आला. तेथे एका आसनावर बसला. सुलोचना ती चित्रे पाहून प्रसन्न झाली.

'सुंदर आहेत चित्रे. त्या चित्रकारांना माझ्याकडे घेऊन याल?' तिने विचारले.

'केव्हा आणू?'

'उद्या तिसऱ्या प्रहरी आणा.'

तो विजयचा घरमालक निघून गेला. विजय आज जरा सचिंत बसला होता. तो ही आनंदाची वार्ता घेऊन त्याचा घरमालक आला.

दुसऱ्या दिवशी विजय आपल्या त्या घरमालकाबरोबर सुलोचनेकडे आला. सुलोचनेने त्याचा सत्कार केला.

'तुम्ही आता जा. आम्ही कलेवर चर्चा करीत बसू. माझ्या घोडागाडीतून याना मी पाठवीन.' ती त्या घरमालकाला म्हणाली. तो निघून गेला. सुलोचना व विजय दोघेच तेथे होती. कोणी बोलत नव्हते.

'ही पाहा माझी चित्रे; परंतु रंगांची मिसळ मला अद्याप साधत नाही.' ती म्हणाली.

'कठीणच आहे ती गोष्ट. सायंकाळी आकाशातील रंग पाहावे. तेथे शेकडो रंग कसे एकमेकांत मिसळून गेलेले असतात किंवा फुलांच्या पाकळ्या पाहा. काही पाकळ्यांतून निरनिराळे रंग असतात; परंतु एक रंग कोठे संपला व दुसरा कोठे सुरू झाला हे लक्षात येत नाही. गोकर्णाचे फूल पाहा तुम्ही. निळा व पांढरा रंग कसा मिसळून गेलेला असतो किंवा लहान मुलाच्या गालांचा रंग. पांढरा व गुलाबी रंग त्यात कसा असतो मिसळलेला!'

'तुम्ही कोणत्या देशाचे?'

'मी असाच एक फिरस्ता आहे.'

'तुम्ही एकटेच आहात?'

'दुर्दैवाने सध्या एकटाच आहे.'

'तुम्ही रोज माझ्याकडे येत जा. तुम्ही माझे कराल एक चित्र तयार? मी अशी येथे समोर बसेन. तुम्ही माझे चित्र काढा. काढाल?'

'हो काढीन.'

'तुम्ही कधी असे कोणाचे काढले होते चित्र?'

'कल्पनेने काढले होते.'

'समोर कोणी स्त्री बसली आहे व तिच्याकडे पाहून काढीत आहात, असे कधी काढले होतेत?'

'नाही.'

'माझे काढा हं. तुमच्या हातची आठवण राहील आणि त्या निमित्ताने तुम्ही बरेच दिवस या शहरात राहाल. नाही तर जायचेत उडून! खरे ना?'

तो लाजला. तिने त्याला फलाहार दिला. सुंदर रसाळ फळे.

'जातो आता मी.' तो म्हणाला.

तिने नोकराला हाक मारली. घोड्याच्या गाडीतून त्याला पोचविण्यास तिने सांगितले.

'परंतु थांबा. तुम्ही सुंदर पोषाख करा. तुम्ही कलावान् आहात. माझे कलावान्. ही घ्या वस्त्रे. घाला अंगावर. डोक्याला नका काही बांधू. तुमची झुलपे तुम्हाला शोभतात.' ती म्हणाली.

सुंदर रेशमी पोषाख करून तो निघाला. किती गोड दिसत होता त्या वेळेस विजय! सुलोचना त्याच्याकडे पाहात राहिली. घोड्याच्या गाडीतून विजय गेला. तो घरी आला.

'तुमच्यावर फार कृपा दिसते त्या मुलीची. तुमचे भाग्य आता फुलेल.' घरमालक म्हणाला. 'देवाची दया.' विजय म्हणाला.

विजय आता त्या मालकाकडेच जेवी. तो त्याच्या घरातलाच झाला. दुसऱ्या दिवशी सकाळी सुलोचनेने मेवामिठाई, फळांचे करंडे वगैरे भरून विजयकडे पाठविले. विजयने ते सारे घरमालकाकडे दिले. त्याने शेजाऱ्यांनाही दिले.

विजय आता रोज तिसऱ्या प्रहरी सुलोचनेकडे जाऊ लागला. ती एका आसनावर हातात फुले घेऊन बसे आणि तिच्याकडे पाहून विजय तिचे चित्र



काढी. चित्र काढताना विजय खाली बघे; परंतु सुलोचनेची दृष्टी त्याच्याकड असे. त्याच्या लक्षात ही गोष्ट येई व तो गोंधळे. मग त्याचे कलम नीट काम देत नसे.

'पुरे आज. माझे मन जरा अस्वस्थ आहे.' तो म्हणे.

'पुरे. घाई काय आहे? माझे चित्र कधी पुरे न होवो असेच मला वाटते. रोज एक कुंचला मारा व पुरे करीत जा काम. बरेच दिवस पुरेल. तुम्ही बरेच दिवस राहाल.' असे ती हसून म्हणे.

'जातो आता.' तो म्हणे.

'बरे.' ती म्हणे.

असे दिवस चालले होते. एके दिवशी तर विजय फारच गोंधळला.

'तुमचे चित्र मला कधीही पुरे करता येणार नाही. माझी बोटे चालतच नाहीत.'

'असे का होते?' तिने विचारले.

'तुम्ही रागावाल. कारण सांगेन तर.'

'तुमच्यावर मी रागावणार नाही.'

'ऐका तर. मी तुमचे चित्र काढीत असतो, परंतु तुम्ही सारख्या माझ्याकडे पाहात असता; त्यामुळे मी अस्वस्थ होतो.' तो म्हणाला.

'विजय, तुम्ही ज्याप्रमाणे माझे चित्र काढीत आहात, त्याप्रमाणे तुम्हाला न विचारता तुमचे चित्र मी काढीत असते. माझ्या हृदयाच्या फलकावर भावनांच्या कुंचल्यांनी तुम्हाला मी रंगवीत असते. म्हणून तुमच्याकडे मी सारखे बघते. विजय, तू एकटाच आहेस?'

'म्हणजे?'

'तू माझा हो. या सुलोचनेचे हृदय तू जिंकले आहेस. आजपर्यंत अनेक तरुण आले गेले. या सुलोचनेचे डोळे कोणाकडे ओढले गेले नाहीत; परंतु तू मला जिंकलेस. माझे जीवन तू रंगवलेस. रंगाऱ्या, आता मला सोडून जाऊ नकोस. विजय, बोल. होशील ना तू माझा? माझे न हुंगलेले निर्मळ जीवन तुला मी अर्पण करते. घे माझे प्रेम व मला कृतार्थ कर.'

'अशक्य, अगदी अशक्य.'

'का अशक्य?'

'माझी मुक्ता माझ्यासाठी रडत असेल. मुक्ता माझे दैवत.'

'कोण मुक्ता?'

'माझी प्रिय पत्नी.'

'तू एकटा ना आहेस?'

'दुर्दैवाने एकटा आहे, असे मी म्हटले होते.'

'विजय, तू तेव्हाच स्पष्ट सांगतास, तर माझे मन मी आवरले असते परंतु मला खरेच वाटले की, तू एकटा आहेस. म्हणून मी तुला मनाने वरले. तू गरीब का श्रीमंत याची मी चौकशीही केली नाही. मी तुला सर्वस्वाने वरले; परंतु आता काय? तुझा शेवटचा नकार ना?'

'होय.'

'तर मग एक तरी कर. या शहरातून तू लौकर चालता हो. तू या शहरात असून माझ्याजवळ नाहीस, हा विचार मला सहन होणार नाही. जा. या शहरातून जा. मी तुझी मानसपूजा करीत राहीन. आपले हे स्वप्न मी मनात अमर करीन.'

विजय प्रणाम करून निघाला.

'शेवटचा फलाहार घेऊन जा.' ती म्हणाली.

त्याने दोन द्राक्षे खाल्ली.

'क्षमा करा. माझा निरुपाय आहे.' असे म्हणून तो गेला.

घोड्याच्या गाडीतून घरी आला.

तो आज बोलला नाही: जेवायला नको म्हणाला. कपाळ दुखते असे सांगून, तो आपल्या अंथरुणावर पडला. जगातील काय ही गुंतागुंत असे त्याच्या मनात येत होते; परंतु त्याला स्वतःचा अभिमानही वाटत होता. सुलोचनेसारखी सुंदर रमणी, अपार संपत्ती, मानमान्यता, कीर्ती, या सर्वांना त्याने मुक्तासाठी झुगारले होते. माझ्यावर मुक्ताची सत्ता आहे. इतर कोणाची नाही. 'मुक्ता, मी तुझा आहे हो, तुझा.' असे म्हणत तो झोपी गेला.

※ ※ ※

यती की पती : प्रकरण दहावे

# सर्वनाश

मुक्ताला ते पहिले पत्र मिळाले होते. ते पत्र घेऊन विजयच्या घरी ती गेली होती. विजयच्या बापाचा राग आता कमी झाला होता. विजय केव्हा घरी येईल असे त्यास झाले होते. मुक्ताने ते पत्र वाचून दाखविले. मुलावर आलेले कठीण प्रसंग ऐकून मायबापांच्या डोळ्यांत पाणी आले. मंजुळा मुसमुसू लागली.

'केव्हा येईल विजय परत?' मंजुळेने विचारले.

'रुक्माकाकाने राजाकडून क्षमापत्र आणले आहे. राजाला सारी खरी हकीगत रुक्माने सांगितली. त्याने ग्रामपतीलाही खरमरीत पत्र पाठवले आहे, असे कळले. आता विजय राजगृहाला गेला की, पुन्हा पत्र पाठवील. तेथे तो मुक्काम करणार आहे. तेथे त्याला आपण पत्र पाठवू व परत ये, भीती नाही, असे कळवू. विजय येईल परत. सर्व काही गोड होईल.' मुक्ता म्हणाली.

'आणि तू सुद्धा जप प्रकृतीला. पायी कशाला आलीस? तुझे दिवस भरत आलेले. तू आमच्याकडेच बाळंतपणास येतीस तर आम्हाला समाधान झाले असते.-विजयच्या बाबतीत मी जो अन्याय केला त्याचे थोडे परिमार्जन झाले असते.' बलदेव म्हणाला. 'परंतु बाबा नको म्हणतात. विजय आला म्हणजे सारी एकत्र राहू.' ती म्हणाली.

पुढे मुक्ता प्रसूत झाली. तिला मुलगा झाला. रुक्मा व तिचे वडील तिची काळजी घेत. रुक्माने डिंक कुटून तिला लाडू करून दिले. मंजुळेनेही आईकडून आळिवाचे लाडू पाठविले. सासूसासरे येऊन बाळ पाहून गेले. सुंदर बाळ.

रुक्मा त्या बाळाला आंदुळी. गाणी व पोवाडे म्हणे. बाळाचे नाव शशिकांत ठेवण्यात आले. मुक्ता विजयच्या पत्राची वाट पाहात होती. बाळाची बातमी केव्हा एकदा विजयला पाठवू, असे तिला झाले होते. ती बाळाला जवळ घेई व म्हणे, 'कोठे आहेत तुझे बाबा? लौकर येऊ देत हो घरी. मग ते तुला घेतील. मी नाही मग घेणार.'

एके दिवशी विजयचे ते दुसरे पत्र आले. मुक्ताने ते वाचले. त्या चोरांची हकीगत वाचताना तिच्या अंगावर काटा उभा राहिला आणि ते वादळ! किती एकेक जिवावरचे प्रसंग. तिचे डोळे ते पत्र वाचताना शंभरदा भरून आले; परंतु शेवटी तिला आशा आली. तिने बाळाचे मटामट मुके घेतले. 'आता पाठवत्ये हो पत्र त्यांना. बोलावते विजयला. तुझे बाबा येतील हो राजा.' असे म्हणून तिने बाळाला पोटाशी घट्ट धरले.

एके दिवशी बैलगाडीत बसून ती शिरसमणीस आली. ते पत्र तिने सर्वांना वाचून दाखविले. शशिकांतला सर्वांनी घेतले. मुक्ताला मुलगा झाल्यापासून बलदेव व पार्वती तिच्यावर फारच ममता करू लागली होती. मंजुळेने ते पत्र वाचले.

'देवच त्याला सांभाळीत आहे. गुणी पोर.' बलदेव म्हणाला.

'कधी दृष्टीस पडेल असे झाले आहे.' पार्वती म्हणाली.

'येईल हो आई लौकर.' मंजुळा आशेने व प्रेमाने म्हणाली.

मुक्ता जायला निघाली.

'मुली, दोन दिवस राहा ना आमच्याकडे.' बलदेव म्हणाला.

'वैनी, राहा ना ग. शशिकांताला मी खेळवीन.' मंजुळा म्हणाली.

गाडीबरोबर रुक्मा आला होता. त्याच्याबरोबर शेवटी निरोप पाठवला गेला की, मुक्ता दोन दिशी येईल म्हणून.

मुक्ताला आज आनंद झाला होता. सासरच्या प्रेमामुळे ती आज राहिली होती. विजयवर ज्या अनेक विपत्ती प्रवासात आल्या, त्यामुळे बलदेवांचे हृदय अगदी वितळून गेले होते. लहानग्या शशिकांतचे कोण कौतुक चालले होते.

दुसऱ्या दिवशी मुक्ता माईजींकडे गेली. शशिकांतला माईजींनी घेतले. 'डोळे कसे विजयच्या डोळ्यांसारखे आहेत.' त्या म्हणाल्या.

'मुक्ता, एक मोठा व्यापारी आला आहे. तो जायचा आहे. तो तुझे पत्र नेईल. दे लिहून.' माईजी म्हणाल्या.

'माईजी, तुम्हीही लिहा ना पत्र.' ती म्हणाली.

'बरे हो. मीही लिहीन.' माईजी म्हणाल्या.

दोन्ही पत्रे तयार झाली. मुक्ताने लहानसेच परंतु गोड पत्र लिहिले होते. माईजींनीही 'आता ये, धोका नाही. राजा प्रसन्न आहे. तो ग्रामणीवरच रागावला. तू तुरुंगातून पळालास त्याचे राजाने कौतुकच केले व तुझे करणे योग्य होते, असे राजा हसत म्हणाला.' वगैरे लिहिले होते.

ती दोन्ही पत्रे एका मोठ्या लखोट्यात घालण्यात आली.

'परंतु ही पत्रे नेऊन कोण देईल?' माईजी म्हणाल्या.

'सुमुख नेऊन देतील.' मुक्ता म्हणाली.

पत्रे घेऊन मुक्ता आली.

'सुमुख, ही पत्रे त्या व्यापाऱ्याला नेऊन द्याल? नीट चौकशी करा हो.' मुक्ताने सांगितले.

'तो व्यापारी येथून गेला; परंतु मी पळत जातो. त्याला गाठतो. काळजी नका करू. विजयला पत्रे. होय ना?' त्याने विचारले.

'होय सुमुख.' ती आनंदाने म्हणाली.

सुमुखने ती पत्रे नेली. त्याने ती पत्रे फोडली. वाचली. त्याचा मत्सर आज पुन्हा जागृत झाला. त्याने ती दोन्ही पत्रे न देता तिसरेच एक लिहिले. काय लिहिले त्याने त्या पत्रात? त्याने मुक्ता मरण पावली, असे लिहिले होते. खाली माईजींच्या हस्ताक्षरासारखी त्याने त्यांची सही केली. विजयचे त्या पत्रात समाधान केलेले होते.

'आता कला हीच तुझी पत्नी किंवा भिक्षू हो. धर्म तुला शांती देईल. पती होणे तुझ्या नशिबी एकंदरीत नव्हते. आता यती हो. देवाची तीच इच्छा दिसते –' असे लिहिले होते. सुमुखने ते पत्र बंद करून त्या व्यापाऱ्याच्या हाती दिले. माईजींनी दिलेले पत्र म्हणून त्या व्यापाऱ्याने ते मस्तकी धरले. पत्रावर विजयचा राजगृह येथील पत्ता होता.

सुमुख परत आला.

'भेटला का व्यापारी?' मुक्ताने विचारले.

'हो. पळत गेलो व गाठले त्याला. आता विजयला पत्र मिळेल.'

'शशिकांताचे बाबा लौकर येतील.' मंजुळा म्हणाली.

'येऊ दे एकदा सुखरूप घरी.' आई म्हणाली.

इकडे राजगृहात विजय अलीकडे फारसा बाहेर पडत नसे. सुलोचनेला वाटले की, आपल्या सांगण्याप्रमाणे खरोखरच विजय गेला. एके दिवशी सायंकाळी विजय बाहेर पडला. तो फिरत फिरत गंगातीरी गेला. तेथे किती तरी वेळ बसला. गंगेचा प्रवाह किती सुंदर दिसत होता!

शेवटी तो उठला व घरी आला. घरमालक एकदम त्याच्याकडे आला व म्हणाला, 'तुमचे पत्र आले, हे बघा. घरचे पत्र ना? आनंदी व्हा. हसा.' विजयने पत्र हातात घेतले. त्याने ते वाचले. तो रडू लागला.

'काय झाले विजय?'

'सर्वनाश! अरेरे! सर्वनाश!' एवढेच तो उद्गारला. त्याचा शोकावेग पाहून घरमालकही दु:खी झाला. आपण आनंदाचे असेल म्हणून पत्र दिले. तो ते अती दु:खाचे निघावे याचे त्याला वाईट वाटले.

'विजय, काय झाले? नीट सांगा. रडू नका.'

'माझी मुक्ता मेली. जिला भेटण्याच्या आशेने मी अनेक संकटांशी झुंजत आशेने जिवंत राहिलो, ती माझी मुक्ता मेली! असा कसा देव. माझ्या पाठीस लागला आहे हात धुवून! छे:, या जगात अर्थ नाही. न्याय नाही. नीती नाही. हे एक लहरी जग आहे. सारे निरर्थक आहे. कसला धर्म नि कसले काय! अरेरे! मुक्ता! माझी मुक्ता! माझी आठवण काढून झुरून झुरून मेली असेल. माझे दुष्ट बाबा! त्यामुळे हे असे झाले. जाऊ द्या. सारा खेळ खलास. सारे फोल आहे. कशात काही स्वारस्य नाही. माझी श्रद्धा आज मेली. सर्वनाश, सर्वनाश!' असे विजय वेड्यासारखे बोलू लागला. मालकाने व त्याच्या पत्नीने विजयचे समाधान केले; परंतु तो बेचैन झाला. घरातून बाहेर पडला. रात्री केव्हा तरी घरी आला. तो ना धड नीट खाई, ना पिई.

'मी आता जातो कोठे तरी. तुमच्याकडे इतके दिवस राहिलो. आता पुरे. तुमचे उपकार आहेत. जातो.' असे सांगून तो बाहेर पडला. काय करावे ते त्याला सुचेना; परंतु हळुहळू तो वाटेल तसा स्वैर वागू लागला. त्याच्या जीवनात आता कशालाच किंमत राहिली नव्हती. तो बेफाम झाला. उच्छृंखल झाला.

त्याचा संयम संपला. सारी बंधने तुटली. तो तरुण होता. सुंदर होता. तो वेश्यांकडे जाऊ लागला. वाटेल ते खाऊ लागला. दारू पिऊ लागला. सुखोपभोगात रंगला, दंगला.

परंतु ह्या गोष्टी सुलोचनेच्या कानांवर गेल्या. तिला अत्यंत दु:ख झाले. ज्याच्यावर मी प्रेम केले, त्याचा का असा अध:पात व्हावा? त्याचा असा अध:पात नाही होता कामा! माझे मधुर प्रेम त्याला वाचवू शकत नाही; परंतु माझे कठोर प्रेम त्याला वाचवील. तिने मनात एक निश्चय केला. तिने एका मारेकऱ्यास बोलावले.

'हे बघ. असा असा तो तरुण आहे. दिसतो तो मदनासारखा. त्याचे कान जरा लांबट आहेत. साऱ्या राजधानीत तो उमटून पडेल असाच आहे. त्याला हुडकून काढ व त्याला या जगातून नाहीसा कर. त्याच्या सुंदर झुलपांची मला खूण आणून दे. जा. एक पळभरही त्याला या जगात ठेवू नको.' असे तिने त्या मारेकऱ्यास सांगितले. मारेकरी प्रणाम करून गेला. सुलोचना रडली.

'माझ्या प्रियकराला का मी मारावे? परंतु मी मारीत नाही. त्याला तारीत आहे. विजय चिखलात न पडो. तो निर्मळ निष्कलंक राहो. विजयला वाचवण्यासाठी मी मारीत आहे. त्याचा आत्मा पडू नये म्हणून हे करीत आहे. विजय, माझे प्रेम झिडकारून तू चिखलात रे का बुड्या मारीत आहेस? तू माझे प्रेम अव्हेरलेस, परंतु मी तुझीच पूजा करीत आहे. तुला मी पडू देणार नाही. विजय, क्षमा कर. मारेकऱ्याचा प्रहार ते माझे प्रेम समज.' असे सुलोचना मनात म्हणत होती. रडत होती.

त्या दिवशी रात्री अंधार होता. विजय निराशेच्या अंधारात होता. तो नदीतीराकडे जात होता. त्याच्या पाठोपाठ तो पाहा मारेकरी येत आहे. इतक्यात आकाशात ढग जमा झाले. कडाड्कडाड् गर्जना होऊ लागल्या. मुसळधार पाऊस पडू लागला. मध्येच कानठळ्या बसवणारा कडकडाट होई व लख्खकन् वीज चमके. 'पड, माझ्या डोक्यावर तरी पड' असे विजय विजेला म्हणे; परंतु कोण येत आहे ते पावसातून? कोण? विजय थांबला. वीज वर चमकली, त्या माणसाच्या हातातील हत्यार विजयला दिसले वाटते! 'कोण? तो का कोणी खुनी येत आहे? माझ्या पाठीस मरण का लागले आहे? मुक्ताचा बळी घेऊन माझ्या का आता पाठीस आले? कठोर मरणा, तुझ्याशी ही शेवटची झुंज

घेऊ दे. मी आपखुषीने मरेन, परंतु मारणाऱ्याकडून मरणार नाही. ये मारेकऱ्या ये. मी आपण होऊन मरेन, परंतु तुझ्या हातात सापडणार नाही.' असे म्हणून विजय पळत सुटला. पाठोपाठ तो मारेकरीही येत आहे. दोघे नदीतीरी आले. नदी घो घो करीत चालली होती. प्रचंड पूर आला होता. विजयने पुरात उडी घेतली. त्या मारेकऱ्यानेही उडी घेतली. तो मारेकरी झपझप जवळ येत आहे. विजयची शक्ती कोठे गेली? मुक्ता गेल्यामुळे त्याची शक्ती क्षीण झाली का? मारेकरी नजीक आला. त्याने विजयची झुलपे पकडली. त्याने हत्यार काढले; परंतु विजय निसटला. झुलपेच फक्त दोन कापली गेली. ती झुलपे कमरेला खोवून तो मारेकरी पुन्हा मगराप्रमाणे पाठीस लागला.

'मारेकऱ्या, तू मला का मारीत आहेस? काय मी पाप केले? अरे, अनेकांचे प्राण मी वाचवले. मी कोणाचे वाईट केले नाही. याच नदीत एकदा तुफानात गलबत उलटले. मी अनेकांचे प्राण वाचविले. एक बाई, तिचे मूल यांचे प्राण मी वाचविले; परंतु देव माझ्या का असा पाठीस? मला जगायची इच्छा नाही; परंतु असे अघोरी मरण मला नको. मारेकऱ्या, तुझा खंजीर मला दे. मी माझ्या हाताने माझे प्राण घेतो; परंतु तुझा घाव नको.'

'तुम्ही एका बाईचे व मुलाचे प्राण वाचवलेत?' मारेकऱ्याने लाटांवर हेलकावत विचारले.

'हो, या गंगेचीच शपथ.'

'तर मग तू माझा उपकारकर्ता आहेस. ती माझीच बायको. तो माझाच मुलगा; परंतु मी गरीब आहे. पोटासाठी आज मारेकरी बनलो. पुन्हा नाही हा धंदा करणार. क्षमा करा. जातो मी.' तो मारेकरी म्हणाला.

'तुझ्या बायकोला प्रणाम. मुलास आशीर्वाद. जा. लोकांचे प्राण वाचव. घेऊ नको.'

'परंतु घरच्यांचे प्राण कसे वाचवू?'

'काही प्रामाणिक उद्योग कर. सुलोचना म्हणून सरदाराची कन्या आहे. तिला सांग की, विजयने मला पाठवले आहे, ती तुला मदत करील.'

'परंतु तिनेच तर मला पाठविले आहे.'

'सुलोचनेने?'

'होय.'

'तरीही माझा निरोप तिला सांग, जर तुला योग्य वाटले तर.'

'तुमची झुलपे मजजवळ आहेत. ती मी तिला दाखवीन व तुम्हाला मारले असे सांगेन. ती बक्षीस देईल.'

'ठीक तर. मी मेलो असेच सांग. कारण, मी जिवंत असून खरोखर मेलेलाच आहे. जो निराश झाला तो मेलाच. ज्याला आशा आहे तोच खरोखर जिवंत आहे.'

'प्रणाम. क्षमा करा.'

'प्रणाम. तो परमेश्वर सर्वांना क्षमा करील.'

मारेकरी गेला. गंगेच्या लाटांवर विजय नाचत होता. तो आणखी वरून अपरंपार पुराचे पाणी आले. पाऊस जरा ओसरला होता, परंतु पुन्हा पडू लागला. विजय, कसा रे तू वाचणार? का गंगामाई आज तुला पोटाशी धरणार?



यती की पती : प्रकरण अकरावे

# यतिधर्माची दीक्षा

बुद्धभिक्षूंच्या मठात एका पलंगडीवर विजय पडला होता. आपण येथे कसे आलो, पुरात वाहात जाऊन कोठे लागलो ते त्याला काहीच आठवत नव्हते. तो विचारमग्न होता. मध्येच तो डोळे उघडी. मध्येच तो डोळे मिटी.

इतक्यात मठाधिपती तेथे आले.

'बेटा, आली का नीट शुद्ध ?' त्यांनी प्रेमाने विचारले.

'होय महाराज; परंतु मी येथे कसा आलो ?' त्याने विचारले.

'गंगेला मोठा पूर आला होता. हजारो लोक वाहून गेले. गाईगुरे वाहून गेली. मठातील सारे भिक्षू बाहेर पडले. ज्यांना वाचवता येईल त्यांना वाचवू लागले. एके ठिकाणी तू सापडलास. तुला त्यांनी उचलून आणले. तू वाचलास. तू शुद्धीवर येत नव्हतास. तू आपोआप हळुहळू शुद्धीवर येशील असा माझा तर्क होता. आता बरे वाटते ना ? तुझे घर कोठे आहे ? गाव कोणता ? घरी वाट पाहात असतील तुझी माणसे.'

'महाराज, मला कोणी नाही. माझ्या जीवनात अर्थ नाही. जगायची मला इच्छा नाही. तुम्ही उगीच या अभाग्याला तुमच्या पुण्यमय संस्थेत आणलेत.'

'असे नको बोलू. ज्याच्या जीवनातील अर्थ नाहीसा झाला, तो जगेल कशाला ? तू वाचला आहेस, यावरून तुझ्या जीवनात अर्थ आहे. तू एकटाच असशील, तुझ्यावर कोणी अवलंबून नसेल तर तू आमच्या मठात ये. आमचा हा भ्रातृसंघ आहे. जगाची सेवा करावी हा आमचा धर्म. दुष्काळ आला, रोग

आले, पूर आले तर आम्ही सर्वांच्या सेवेसाठी धावतो. आम्ही गावोगाव जातो. प्रेमधर्माचा प्रचार करतो. भेदभाव दूर करतो. चोर, दरोडेखोर, खुनी जे कोणी भेटतील त्यांना उपदेश करतो. राजाच्या तुरुंगात जातो. कैद्यांना दोन शब्द सांगतो. राजदरबारात जातो. त्यांना प्रजेचे कसे कल्याण करावे ते सुचवतो. असा हा भ्रातृसंघ आहे. तुम्ही निराश नका होऊ. जगात अपरंपार दुःख आहे. ते जोपर्यंत दूर करायला आहे, तोपर्यंत माणसाने जगण्यात अर्थ नाही असे म्हणू नये. तुम्ही विचार करा.' असे म्हणून विजयच्या मस्तकावरून हात फिरवून मठाधिपती गेले.

विजय विचार करू लागला. त्याला त्या मठाधिपतींचे म्हणणे बरोबर वाटले. आपण व्हावे भिक्षू, व्हावे यती असे त्याला वाटले. लहानपणी वाचलेले धर्मग्रंथ त्याला आठवू लागले. तो आता त्या दृष्टीने विचार करू लागला. आपण सर्वत्र हिंडू, उपदेश करू, गोड बोलू, सेवा करू असे मधुर चित्र तो मनात रंगवू लागला. त्याच्या तोंडावर प्रसन्नता फुलली.

मठाधिपतींचे मठात रोज सकाळी व रात्री प्रवचन असे. विजय ऐकायला जाई. तो मठातील इतर मंडळींप्रमाणे वागू लागला. नीतिनियम, व्रतेवैकल्ये आचरू लागला. तो मोठ्या पहाटे उठे. नदीवर जाऊन स्नान करी. मग आपल्या खोलीत ध्यान करी. चित्त सर्व वस्तूंपासून अलिप्त करण्याचा अभ्यास करी. मग प्रवचन ऐके. दुपारी धर्मग्रंथ वाची. इतर मंडळींबरोबर प्रबोधचर्चा करी. सायंकाळी पुन्हा ध्यान करी. रात्री प्रवचनाचे चिंतन करीत झोपी जाई.

काही दिवस गेले आणि विजयादशमीचा दिवस आला. भगवान बुद्धांचा हा जन्मदिवस.

'वत्स विजय, भगवान बुद्धदेवांचा आज जन्मदिवस. मनावर विजय मिळविणाऱ्या बुद्धदेवांचा हा जन्मदिवस. तूही मनावर विजय मिळविण्यासाठी धडपडत आहेस. मला असे वाटते की, तू आजच्या दिवशी यतिधर्माची दीक्षा घ्यावीस. तू आमच्यापेक्षाही थोर आहेस. तुझे वर्तन निर्मळ आहे. तुझी वाणी पवित्र व प्रेमळ आहे. अनुभवाने तुझे जीवन खोल झाले आहे. तू आमच्यात ये. बुद्धदेवांचा संदेश तू सर्वत्र पसरव.' असे मठाधिपती म्हणाले.

'महाराज, माझी तयारी आहे.'

सर्वांना आनंद झाला. भगवी वस्त्रे तयार होताच विजयने मुंडन केले. भगवी वस्त्रे त्याने परिधान केली. हातात दंड घेतला. धर्मग्रंथातील पवित्र भागाचे पठण झाले. यतिधर्माचे नियम उच्चारले गेले. विजयचे नाव सेवानंद असे ठेवण्यात आले.

सेवानंद आता आसपास जाई. उपदेश करी. तो निरनिराळ्या ठिकाणच्या विहारांत जाई. मठांतून जाई. प्रवचन करी. त्याची प्रशांत व प्रसन्न मुद्रा पाहून त्याच्याविषयी सर्वांना आदर वाटे.

राजगृहाच्या राजाच्या कानांवर सेवानंदांची कीर्ती गेली. एक मोठा खुनी गुन्हेगार सापडला होता. त्याला कोणती शिक्षा द्यावी, राजाला समजेना. राजाने सेवानंदांना बोलावले.

'सेवानंद, आज मोठी सभा भरवू. तो खुनी मनुष्यही एका बाजूस बसेल. तुमचे प्रवचन ऐकून त्याच्या डोळ्यांना पाणी आले, तर त्याला मी सोडीन. आज अहिंसाधर्माची कसोटी आहे.' राजा म्हणाला.

आणि सभा भरली. हजारो लोक व्यवस्थित बसले होते आणि तो खुनी इसमही बसला होता. सेवानंद आले. त्यांची ती उंच प्रसन्न मूर्ती पाहून सर्वांच्या डोळ्यांचे पारणे फिटले. त्या खुनी इसमानेही हात जोडले.

सेवानंदांचे प्रवचन सुरू झाले.

'बंधूंनो, तुम्हाला मी दोन गोष्टी सांगणार आहे. भगवान बुद्ध प्रेमाचा संदेश देऊन गेले; परंतु तो अजून आपल्या आचरणात नाही. जगातील दुःख दूर व्हावे म्हणून बुद्धदेव तळमळत. एकाही माणसाचे दुःख जोपर्यंत शिल्लक आहे, तोपर्यंत मी पुनः पुन्हा पाचशेही जन्म घेईन असे ते म्हणत. दुसऱ्याचे दुःख दूर करण्यासाठी ते गर्भवासाची अनंत दुःखे सहन करण्यास तयार होते. बंधूंनो, जगात दुःख का आहे? हाच पाहा ना अभागी कैदी. तो खुनी आहे; परंतु त्याचा काय दोष? त्याला परिस्थितीच नीट अनुकूल मिळाली नाही. या तुमच्या राजधानीत मागे एक खुनी माझा खून करण्यासाठी आला होता. मी त्याला म्हटले, 'मी तुझे काय केले?' तो म्हणाला, 'मी पोटासाठी खून करीत आहे. तुमचा मी खून केला तर कोणी मला ५०० रुपये देणार आहे.' मित्रांनो,

त्या खुनी माणसाच्या घरी मुले उपाशी होती. त्याने काय करावे? राजा, राज्यात चोऱ्या होऊ नयेत, खून होऊ नयेत, म्हणून नुसत्या शिक्षा ठोठावून भागत नाही. चोरी होणार नाही, खून होणार नाहीत अशी परिस्थिती निर्माण कर. माणसास उचलून फाशी देणे सोपे आहे. त्याने खून केला, म्हणून तुम्ही त्याचा खून करता. तुम्हीही खुनीच. राजाचे कर्तव्य आहे की, सर्वांना काम मिळेल, सर्वांना उद्योगधंदा मिळेल, पोटाला मिळेल, याची व्यवस्था करणे. राजाचे काम आहे की, सर्वांना ज्ञान व आनंद मिळेल असे करणे.

कधी कधी द्वेषाने, मत्सरानेही खून होतात. सारेच काही पोटासाठी नसते. काही गोष्टी अर्थासाठी, काही कामासाठी; परंतु कोणत्याही परिस्थितीत अपराध्याचा वध करू नये. आपणास दुसऱ्याचे प्राण घेण्याचा अधिकार नाही. साधा एक किडा आपणास बनवता येणार नाही आणि आपण हृदय, बुद्धी,मन यांनी संपन्न मानव का एकदम मारून टाकावा? दगडांतून आपण अप्रतिम पुतळे निर्माण करतो, माणसातून सज्जन नाही का निर्मिता येणार? दगडाहून का माणूस टाकाऊ आहे?

विचार करा. त्या खुनी माणसास मी हृदयाशी धरीन. मी का खुनी नाही? मीही अनेकांचे वाईट चिंतिले असेल. ज्या ज्या वेळेस दुसऱ्याचे वाईट चिंतितो, त्या त्या वेळेस मी खुनीच असतो. मी कोणाला वाईट म्हणू? सर्वांत वाईट आधी मी आहे. येथे जमलेल्या हजारोंपैकी छातीवर हात ठेवून प्रामाणिकपणे कोण म्हणू शकेल की, मी निर्दोष आहे? आपणा सर्वांस शासन करण्याचे जर देवाने ठरविले, तर तुमच्या आमच्या पापांसाठी देवाने कितीही शिक्षा केली तरी ती कमीच ठरेल.

म्हणून मी काय सांगू? मला फार बोलवत नाही. मी तुम्हा सर्वांस प्रणाम करतो व जाऊन त्या बंधूस हृदयाशी धरतो.'

असे म्हणून सेवानंद निघाले. त्यांनी त्या खुनी अपराध्यास भावनांनी उचंबळून हृदयाशी धरले. सेवानंदांचे डोळे पाझरत होते आणि तो खुनी इसम तर वर पाहीना. त्याच्या डोळ्यांतील अश्रू सेवानंदांच्या चरणांचे प्रक्षालन करीत होते.

'अहिंसाधर्म की जय, प्रेमधर्म की जय, भगवान बुद्धदेव की जय!' असे जयघोष झाले. ती अपूर्व सभा झाली. सेवानंद निघून गेले.



ते मठात आले. मठाधिपतींनी सेवानंदांस हृदयाशी धरले.

'धन्य आहेस तू. प्रेमधर्माचा प्रकाश असाच सर्वत्र पसरव. तुझे जीवन किती अर्थपूर्ण आहे आता?' महंत म्हणाले.

'ही तुमची कृपा.' सेवानंद म्हणाले.

त्या दिवशीचे प्रवचन ऐकून सुलोचना रात्री रडली; परंतु तिला आनंदही झाला. 'माझी निवड किती योग्य होती.' असे ती मनात म्हणाली.

※ ※ ※

यती की पती : प्रकरण बारावे

# स्वदेशात

विजयची वाट पाहून मुक्ता निराश झाली. आपले पत्र मिळाले की नाही, तिला समजेना. विजयवर आणखी तर काही संकट नाही ना आले, अशी शंका तिला येई. शशिकांत आता तीन वर्षांचा झाला. मोठा गोड सुंदर मुलगा.

'आई, केव्हा येतील बाबा?' तो विचारी.

'तूच सांग रे राजा. तुझे बोलणे खरे होईल.' ती त्याला पोटाशी धरून म्हणे.

तिचे वडील आजारी पडले. मुक्ता त्यांची शुश्रूषा करीत होती; परंतु एके दिवशी ते इहलोक सोडून गेले आणि रुक्माही गेला. मुक्ताने रुक्माची मनापासून सेवा केली.

'मुक्ता, तू सुखी होशील. माझा शब्द खोटा होणार नाही.' असे मरताना तो म्हणाला.

'मुक्ता, तू आता आमच्याकडे येऊन राहा.' बलदेव म्हणाला.

'विजय आला म्हणजे येईन. तोपर्यंत नको.' ती म्हणे.

माईजी आता दिवसेंदिवस क्षीण होत चालल्या. त्यांनी शिरसमणी येथे प्रचंड बुद्धमंदिर बांधायचे ठरविले. त्यांनी आपल्या जवळचे सारे जडजवाहीर विकले. मंदिराचे काम सुरू झाले. बुद्धधर्माचे येथे मुख्य केंद्र व्हावे, असे माईजींस वाटे. कनोजच्या राजाला त्यांनी लिहिले, 'राजगृहाकडून एखादा थोर भिक्षू येथे राहायला मिळाला तर पाहा.' कनोजच्या राजाने राजगृहाच्या महाराजांस कळविले. महाराजांनी मठाधिपतीस कळविले.

'सेवानंद, तुम्ही मूळचे कनोजकडचेच ना? तुमच्या राजाकडून एका योग्य भिक्षूची मागणी आली आहे. शिरसमणी येथे एक भव्य बुद्धमंदिर बांधण्यात आले आहे. तेथे बुद्धधर्माचे केन्द्र व्हावे, अशी त्या राजाची इच्छा आहे. तुम्ही तेथे जाल? गेलात तर फार छान होईल.'

'शिरसमणी का त्या गावाचे नाव?'

'हो. कोणी माईजी तेथे आहेत. त्यांनी हे सुंदर मंदिर बांधले आहे. तेथे एक लहानसा मठ आहेच; परंतु कोणी तरी थोर अधिकारी पुरुष त्यांना पाहिजे आहे. तुमच्याहून अधिक थोर आपणात कोण आहे? तुम्ही जा.'

सेवानंदाने संमती दिली. त्याला आनंद झाला. जन्मभूमी म्हणजे पुण्यभूमी! तिचे दर्शन त्याला होणार होते. त्या आपल्या मातृभूमीला तो आता पुन्हा जाणार होता. लोकांच्या मनाची मशागत करायला तो जाणार होता. लोकांच्या जीवनाची शेती सफळ व्हावी, त्यात प्रेम, सहानुभूती, सहकार्य, आनंद यांचे भरपूर पीक यावे म्हणून तो जाणार होता. मनाची शेती करणारा तो शेतकरी होता.

सेवानंद शिरसमणीस आले, त्या वेळेस रात्र होती. ते मठात उतरले. दुसऱ्या दिवशी सकाळी बुद्धमंदिराचा उद्‌घाटन समारंभ होता. सकाळ झाली. मंगल वाद्ये झडू लागली. मंदिराच्या प्रशांत व प्रशस्त आवारात शेकडो स्त्रीपुरुष जमले होते आणि सेवानंद आले. आसनावर बसले. सर्व सिद्धता झाली. बुद्धदेवांच्या मूर्तीला प्रणाम करून, उद्‌घाटन करून सेवानंद बोलू लागले. त्यांची ती अमृतवाणी सारे लोक पीत होते. असे भाषण त्यांनी कधी ऐकले नव्हते. असा तेजस्वी दिव्य महंत त्यांनी कधी पाहिला नव्हता. किती वेळ झाला, कळेना.

इतक्यात चमत्कार झाला! सेवानंदांची दृष्टी एके ठिकाणी गेली. कोण होते तेथे? मुक्ता तेथे होती. विजयची मुक्ता. सेवानंदांची दृष्टी तेथून हलेना. ते सारखे तेथे पाहात राहिले. शेवटी त्यांचे भान गेले. ते बेशुद्ध होऊन पडले. एकच हाहाकार उडाला. सेवानंदांस माईजींच्या पर्णकुटीत नेण्यात आले.

पर्णकुटीत सेवानंद एका कांबळ्यावर पडले होते. रात्रीची वेळ होती.

'माईजी, तुम्ही मला ओळखलेत?'

'होय. तू विजय!'

'माझी मुक्ता जिवंत आहे?'

'तुझी आठवण काढून ती रोज झुरते. आशेने ती जिवंत राहिली आहे. तुझा बाळ शशिकांत तुझी वाट पाहात आहे.'

'बाळ ?'

'हो. तू गेल्यावर मुक्ता बाळंत होऊन बाळ झाला. तुझ्यासारखेच बाळाचे डोळे आहेत. तुला आम्ही पत्र पाठवले होते, राजगृहाच्या पत्त्यावर.'

'तेथे तर मुक्ता मरण पावली असे तुमच्या सहीचे पत्र आले.'

'काही तरी घोटाळा झाला. दोन पत्रे होती का ?'

'नाही. एकच पत्र तुमच्या सहीचे होते. सही फक्त तुमची होती. वरचे अक्षर निराळे होते; परंतु सही मी ओळखली.'

'परंतु सारेच पत्र मी लिहिले होते. सुमुख व्यापाऱ्याजवळ देण्यासाठी घेऊन गेला होता.'

'सुमुख ?'

'हो.'

'त्यानेच तर मग हा घात केला. दुष्ट, दुष्ट सुमुख !' असे म्हणून सेवानंद ताडकन् उठला. तो एकदम आपल्या घरी जायला निघाला. माईजींनी त्याला अडवले नाही.

विजयच्या घरी सर्व मंडळी बसली होती. मुक्ताने मंजुळेस सारी गोष्ट सांगितली होती. एकदम दारावर कोणी तरी धक्का मारला.

'कोण आहे ?' बलदेवने विचारले.

'मी' विजयने उत्तर दिले.

दार उघडले, तो भिक्षू सेवानंद दारात उभे. ते घरात आले. त्यांनी दार लावले. सेवानंद थरथरत होते. सारी चकित झाली.

'बाबा, आई, हा तुमचा विजय. ज्याला तुम्ही छळलेत तो हा विजय आणि सुमुख, कोठे आहे तो चांडाळ ? त्याने घात केला. मुक्ताचे व माईजींचे पत्र फाडून त्याने 'मुक्ता मेली' असे मला लिहिले. खाली माईजींची सही. काय रे ए चांडाळा, दुष्टा, नष्टा, पाप्या ! ऊठ, तुला ठार करतो. कोठे लपशील आता ?' असे म्हणून तो वाघासारखा धावला.

मुक्ताने व मंजुळेने त्याला आवरले.

'विजय, शांत हो. तुझे प्रवचन तू आठव. खुनी माणसांवरही दया करावी, तू सकाळी सांगितलेस. राजगृह राजधानीत खुनी इसमास तू पोटाशी धरलेस व तो रडला, असे तू सकाळी सांगितलेस. मग भावावर नाही का दया करणार? त्यालाही हृदयाशी धर. मन जिंकणे किती कठीण आहे बघ. तुलाही जर क्रोध नाही आवरता येत, तर सुमुखला मत्सर नाही आवरता आला, तर त्यात काय आश्चर्य! तू आलास. भेटलास. शेवट गोड झाला. तू ही भिक्षूची वस्त्रे फेक. संसारी हो. संसारात राहूनच हळुहळू मनाला जिंकून घे.' मुक्ता जणू मुक्त पुरुषाप्रमाणे प्रवचन देत होती.

परंतु सेवानंद एकदम निघून गेले. कोठे गेले? त्यांचा पत्ता लागेना. लोकांना वाईट वाटले. कोठे गेला सेवानंद? मुक्ता दुःखी झाली. आपल्या बोलण्यामुळे तर विजयचे मन नाही ना दुखावले? तो घोर तपश्चर्या करण्यासाठी नाही ना गेला?

गावाजवळच्या एका डोंगरात एक गुहा होती. मुक्ताला ती माहीत होती. अगदी लहानपणी एकदा विजय त्या गुहेत जाऊन बसला होता. त्याने मुक्ताला ती गोष्ट प्रदर्शनाच्या प्रवासाच्या वेळेस रस्त्यात सांगितली होती. एके दिवशी रात्री ती गुहेजवळ आली. त्या गुहेत कोणी तरी होते.

'सेवानंद, असे निराश नका होऊ. गृही व्हायचे नसेल तर नका होऊ, परंतु जीवनाचा उपयोग करा. येथे या गुहेत राहून काय करणार? गरिबांना घरे नाहीत. तुम्ही प्रभावी वाणी वापरून श्रीमंतांची हृदये वितळवा. पैसे जमवा. द्या घरे बांधून. तुम्ही माझे विजय नसाल होणार, तर जनतेचे सेवानंद व्हा. त्यातही मी आनंद मानीन; परंतु असे अंधारात घुबडासारखे राहू नका. भिक्षा मागा. येथे पाखरांना दाणे टाका; पाखरे तुमच्याजवळ येतील. तुम्हाला दुवा देतील. तुमच्या जीवनात आनंद येऊ लागेल. नाव सेवानंद आहे मग दुःखी का? सेवेनेच आनंद लाभेल. अंधारात राहून नाही मिळणार.' असे मुक्ता बोलत होती. ती मुकी झाली. थोडा वेळ बसून निघून गेली.

आणि एके दिवशी अपरंपार पाऊस आला. गोरगरिबांची घरे वाहून जाऊ लागली. कोठे जाणार हे गरीब लोक? ते नवीन बांधलेल्या मंदिराकडे येऊ लागले; परंतु मठवाले येऊ देत ना. इतक्यात गुहेतून सेवानंद धावत आले. 'उघडा मंदिराची दारे! घ्या ते बंधू आत. मंदिर बंद कराल तर बुद्धदेवांना

माराल. या, या सारीजणे. आणा तुमची लेकरे.' सेवानंदाने सर्वांना मंदिरात घेतले. त्याने गावात हिंडून त्यांना काही अंथरापांघरायला आणून दिले. मुक्ताही गोळा करून आणून देत होती. पती निराशा सोडून, गुहा सोडून खाली उतरला, सेवाक्षेत्रात उतरला, म्हणून तिला आनंद झाला.

परंतु तो अद्याप त्या गुहेतच राही. एके दिवशी रात्री स्वच्छ चांदणे पडले होते. मुक्ता शशिकांताला घेऊन निघाली. बाळ झोपलेला होता. मुक्ता त्या गुहेजवळ आली. सेवानंद बाहेर आला.

'विजय, हा तुझा बाळ. घे त्याला जवळ. त्याला आशीर्वाद दे. विजय, तू दुःखी नको होऊ. तुला जर दुःख वाटत असेल तर तू पुन्हा संसारात ये आणि सेवानंद म्हणून राहायचे असेल तर आनंदाने राहा! माझी आठवण जर तुला पदोपदी येत असेल, मला तू विसरू शकत नसशील, तर तू संसारात ये. तेच बरे.'

'मुक्ता, तूच माझी गुरू हो. मी संसारात कसा येऊ? मला महंतांनी दीक्षा दिली आहे.'

'त्या महंतांना आपण सारी सत्यकथा कळवू. त्यांनी जर अनुज्ञा दिली तर तू येशील पुन्हा संसारात?'

'येईन मुक्ता. तू जिवंत असताना मी तुझ्याशिवाय अलग राहू शकणार नाही. वंचना कशी करू?'

'खरे आहे. या बाळाला घे ना मांडीवर.'

'इतक्यात नाही. मी संसारात येईन तेव्हा घेईन. तोपर्यंत मला मर्यादा पाळू दे. यतिधर्माची प्रतिष्ठा मी सांभाळली पाहिजे. खरे ना?'

'होय हो राजा.'



यती की पती : प्रकरण तेरावे

# शेवट

माईजींनी कनोजच्या राजाला ही सर्व हकीगत लिहून कळवली आणि राजाला आग्रहाने राजगृहाला लिहून, तेथील मठातील महंतांस ही हकीगत कळवून सेवानंदास संसारात शिरण्याची परवानगी पुन्हा मिळेल, असे करण्याविषयी कळकळीने त्या पत्रात प्रार्थिले होते. ती सर्व हकीगत वाचून राजाही द्रवला. त्याच्या कन्येलाही वाईट वाटले.

राजाने राजगृहाच्या महाराजांस लिहिले. तेथील महाराजही चकित झाले. त्यांनी मठाधिपतींस बोलावून सर्व हकीगत निवेदिली. मठाधिपतींनी विचार करून उत्तर दिले, 'मी संसारात शिरण्याची अनुज्ञा देतो. भगवंताची लीला.'

महंतांची लेखी अनुज्ञा राजगृहाच्या महाराजांनी कनोजला पाठवली. तेथून ती माईजींकडे आली. माईजींनी सेवानंदास ती दिली. तो आनंदला.

पुन्हा एकदा त्या नवीन बुद्धमंदिरात भव्य सभा भरली. शेकडो स्त्रीपुरुष आले होते. सेवानंदाने सारी वार्ता सांगितली आणि शेवटी ते अनुज्ञापत्र वाचून दाखवले,

*सेवानंद यांस सप्रेम प्रणाम.*

*सर्व वार्ता समजली. तुम्ही पुन्हा संसारात प्रवेश करणेच इष्ट. तुम्ही संसारच परमार्थमय कराल, यात शंका नाही. तुमचे विजय नाव सार्थ आहे. तुम्ही संसारातही विजयी व्हाल. संसारात राहूनही तुम्ही कमलपुष्पाप्रमाणे पवित्र राहाल. तुम्ही संसारास शोभा आणाल. एक गोष्ट ध्यानात धरा. कधी निराश नका होऊ. आशावंत व आनंदी राहून आसमंतात आशा व आनंद निर्माण*

*करा. हेच धर्माचे सार. ते संसारात राहून करा व संसाराच्या बाहेर राहून करा. अधिक काय लिहू? तुमच्या मुक्तास सप्रेम आशीर्वाद. पूज्य माईजींस प्रणाम. मठवासीयांस सप्रेम प्रणाम.*

*''महंत''*

असे ते पत्र वाचून दाखवल्यावर सेवानंदाने किती तरी वेळ भाषण केले. सर्वांच्या भावना उचंबळल्या होत्या. शेवटी तो म्हणाला,

'मित्रांनो, मी तुमचा विजय म्हणून पुन्हा तुमच्यात येत आहे. विजय या नावाने वावरूनच जो सेवेचा आनंद लुटता येईल, तो मी लुटीन; आपण आपले गाव आदर्श करू या. भेदभाव दूर करू या. प्रेमाचा पाऊस पाडू या. कोणी दुःखी नको, निराश नको. उपाशी नको, अज्ञानी नको. आनंद पिकवू. आपल्या गावाचे नाव शिरसमणी. खरोखरच सर्व गावांच्या शिरोभागी शोभेल असा आपला गाव करू. या विजयला पदरात घ्या. सर्वांना प्रणाम, प्रणाम.'

असे म्हणून सेवानंदाचा विजय होऊन तो लोकांत मिसळला. मुक्ता एकदम त्याच्याजवळ आली. विजयने तिच्याजवळचा शशिकांत ओढून घेतला व त्याचे अगणित मुके घेतले.

'अजीर्ण होईल त्याला, विजय.' मुक्ता हसून म्हणाली.

'परंतु माझे पोट नको का भरायला?' विजय म्हणाला.

घरात सर्वांना आनंद झाला. मंजुळाताईच्या जवळ विजय जाऊन बसला. तिच्या डोळ्यांतून आनंदाचे अश्रू घळघळत होते.

'सुमुख कोठे आहे?' विजयने विचारले.

इतक्यात सुमुख आला.

'ये, सुमुख ये. आपण भेटू.'

दोघे भेटले, इतक्यात ग्रामणी आला.

'विजय, मला क्षमा कर. या मुक्ताच्या बापाची इस्टेट मीच लुबाडली होती. तुला त्यांच्याबरोबर जाताना जेव्हा मी प्रथम पाहिले, तेव्हा माझ्या मनात शंका आली की, तो म्हातारा तुला सारे सांगेल आणि तू माझ्या विरुद्ध जाशील. म्हणून माझा तुझ्यावर राग. तू तुरुंगातून कागद घेऊन पळालास, म्हणून तर माझा संशय दुणावला; परंतु तू परदेशात गेलास. प्रश्न मिटला; परंतु मलाही आता पश्चात्ताप होत आहे. मला क्षमा कर. तू आता मोठा मनुष्य झाला

आहेस. तुझी वाणी ऐकून राजे, महाराजे तुझ्या चरणी नमतात. विजय, आम्ही क्षुद्र माणसे. पै पैशाच्या चिखलात बरबटणारी माणसे; परंतु क्षमा कर. ती शेतीवाडी मी परत करतो.' असे म्हणून ग्रामणीने प्रणाम केला.

'बरे, मागचे आपण विसरू या. ते कागदही मी फेकून दिले. जाऊ दे ते. मुक्ताचे वडील तर आता वारले. मुक्ता नि मी त्या शेतीवर राहू. खपू. फुले फुलवू. दाणा पिकवू. श्रमाने खाऊ.' विजय म्हणाला.

विजयने सर्व संसाराची धुरा आता शिरावर घेतली. तो कष्ट करतो. तो आदर्श शेतकरी झाला आहे आणि त्याची कला? ते बुद्धमंदिर त्याने कलेचे माहेरघर केले. भगवान बुद्धांच्या चरित्रातील सुंदर सुंदर प्रसंग त्याने त्या मंदिरात रंगवले आहेत. ते मंदिर म्हणजे गावाचे भूषण आहे. हजारो यात्रेकरू ते पाहायला येतात.

'तू यतीही झालास, पतीही झालास. काही दिवस यती होऊन कीर्ती मिळवून तू पित्याचा संकल्पही पुरा केलास. माझेही नाव राखलेस.' बलदेव एखादे वेळेस हसून म्हणतात.

'विजय, यती होणे बरे, की पती होणे बरे?'

मंजुळा हसून परंतु जरा गंभीरपणे विचारते.

'मंजुळाताई, माझ्यासारख्या ज्यांच्या वृत्ती कोवळ्या, प्रेमळ व भावनोत्कट आहेत, ज्यांना फार कठोर होता येत नाही, अशांनी पती होऊनच, संसारातच यती होण्याची खटपट करावी. त्यांनी संसारात संन्यास आणावा. संसारातच संयम आणून, होईल ती सेवा करून, निरहंकारपणे राहून त्यांनी आपल्या जीवनाचे सोने करावे. खरे ना मुक्ता? हाच आमचा मुक्तीचा पिपीलिकामार्ग.'

※ ※ ※

समाप्त

※ ※ ※

